


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# शेतकऱ्यांना मोठा अभिमान वाटणारीं एंजिनें !





## किर्लोस्कर डिझेल एंजिनें

### शेतीसाठीं उत्कृष्ट

★ एव्ही १ ५हॉर्स पॉवर डिझेल एंजिनें

- वाजवी किंमत
- विश्वसनीय
- चालण्याच्या व सुस्थितींत ठेवण्याच्या दृष्टीनें किफायतशीर
- चालवायला सोपीं
- बसवायला सुलभ
- बिनतकार वर्षानुवर्षे काम देणारीं



**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड, पुणें - ३**










भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक

वर्ष २१ वें

डिसेंबर १९६५

मूल्य १ रुपया



# दीपावली

साहित्य * कला * संस्कृति

## श्रेयनामावलि–

- खास लेख : नमो युद्धाय ( सचित्र–युद्धविषयक ) – द. श्री. मराठे • दुसरा बाजीराव – ( उत्तरार्ध ) – अरविंद ताटके
- चार निवडक कथा : बँडेज – पद्माकर चितळे • स्वप्न – वसंत गांगल • श्रद्धा – डॉ. मनोहर पंडित • उत्तर – सुरेश रघशेट्टी
- कादंबरी : देवाला डोळे असतात ( शेवटचा हप्ता ) – अनु. प्र. श्री. नेरुरकर

## खास क्रिकेट पुरवणी

कथा क्रिकेटची, व्यथा क्रिकेटपटूची – दि. श्री. कराडकर • जागतिक क्रिकेटला नवें वळण लावणारा कर्णधार फ्रँक वॉरेल – प्रा. अविनाश केळकर • यष्टीमागील जादूगार – शिरीष कणेकर • क्रिकेटच्या सुरस कथा – सदानंद चेंदवणकर

याशिवाय

दीपमाला, सन्मान पुष्पें, ऐसी अक्षरें रसिकें, व्यंगचित्रें, विंगकाव्ये – ( ह. शि. खरात )

दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram : Dalalart
टे. नं. ७७७६९

• संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay – 4.





## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मंबई ४,
टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टु डओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ** दलाल यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# दिवाळी अंकांनीं घेतलेला 'चैतन्याचा शोध'

आम्हीं लिहितो. जीवनाच्या जवळ जातो. पाहतो. काहीं सहसंवेदना उत्पन्न होते. तारा छेडल्या जातात. संवादी सूर उमटतात. ताल जुळतो आणि मग अवतरते एखादी कलाकृति–तिला मग कुणीं कादंबरी, नाटक, कथा अशी सोयीनुसार नांवें देतो. त्यांत असते काय ? ह्या माध्यमांतून अखेर प्रगट काय होत असते ? कशाचा तो आविष्कार असतो ? जीवनाचाच तो आविष्कार असतो. जीवनांतूनच घेतलेलें पुन्हां जीवनाकडेच चालत आलेले असते. जसेंच्या तसेंच कीं कांहीं संस्कार घेऊन ? कुरुप होऊन कीं, सुंदर होऊन ? अर्थांतच सुंदर होऊन, सुसंस्कार घेऊन तें आले असते. अनुभव हा अनुभव असतो. त्याला कलेचें रूप मिळते संस्कारांनीं! दगड हा दगड असतो. मूर्ति दिसते शिल्पकाराला. टांकीचे घाव पडतात आणि वर्ष सहा महिने ते सहन करून तो दगड 'देव' बनतो. एका कलाकृतीचे रुप घेतो. रंगाच्या पेटींत रंग असतात. टेबलावर कागद असतात. पण टेबलावरचे ते कागद आणि पेटीतले रंग म्हणजे कलाकृति नव्हे. तीं आहेत अखेर साधनें! कलाकृतीचा जन्म अखेर जीवनांतल्या विविधरुपी सौंदर्याचा वेध घेणाऱ्या हृदयांत होत असतो. अणुरेणूंतल्या चैतन्यांतून त्या चैतन्यांतून भासमान होणाऱ्या, कलात्मक आवाहन देणाऱ्या सौंदर्यातून होत असतो. चाळ नुसतेच चाळ असतात आणि ते धारण करणारे पायही नुसते पायच असतात–मातीचे ! पण त्या चाळांत आणि पायांत एक असामान्य मेळ जुळून येतो. केव्हां ? ते धारण करणाऱ्याच्या मनांत जेव्हां तालांचे नुपुर घुमूं लागतात तेव्हां ! चराचरांत चैतन्य भरलें आहे. ते सारखे बोलावते आहे. "या ! माझा शोध घ्या. माझ्यांतल्या सौंदर्याचे रसपान करा. माझ्यांतल्या शक्तीचा शोध घ्या. हें जीवन सुसह्य करण्यासाठीं त्यांचा उपयोग होईल." मग एखादा आइन्स्टाईन, रसेल, रामन, नारळीकर, शंकराचार्य, कालिदास उठतो आणि त्या चैतन्याचे पृथःकरण करतो. कांहीं नवे शोध प्रकाशांत येतात. नवें चिंतन अवतरते–महान काव्याचा जन्म होतो. युगामागून युगे लोटलीं आहेत.....

आणि तरीही चैतन्याचा शोध चालूंच आहे, चालूंच राहणार आहे. रहायलाही हवा आहे. सारे चैतन्य अजून गवसलेच नाहीं. साहित्यांतला, शास्त्रांतला, तत्वज्ञानांतला, कलांमधला अखेरचा शब्द अजून गवसलाच नाहीं. चैतन्य अजूनही संपलेलं नाहीं. तें संपलें तर तें चैतन्यही राहणार नाही आणि मग जिद्दी माणसांना त्याचा शोध घेण्याचें आव्हान वा आवाहनही मिळणार नाहीं. अशीं चैतन्यें सृष्टींत आहेत, म्हणून सचेतन माणूस जगतो आहे जगण्याची प्रेरणा मिळवतो आहे, व्यक्ती व्यक्तींतले विश्वरूपदर्शन घेण्यासाठीं तो धडपडतांना दिसतो आहे. एकादें रूप गवसले कीं त्याला आनंद होतो खरा. पण तो क्षणभरच ! कारण तें पूर्णरूप नाहीं याची त्याला जाणीव असते. म्हणूनच जीवनांतल्या ह्या अनंतरुपी चैतन्याचा अखेरचा शब्द गवसलेला नाहीं. क्षितिजाचा शोध अनंत योजने चालूनही लागत नाहीं. चंद्रावर जाणारा मानव अजून चंद्राचीं छायाचित्रेंच फक्त घेऊं शकला आहे. छायाचित्रें म्हणजे चंद्र नव्हे. बाह्यरुपानें काळागोरा दिसणारा माणूस म्हणजे काळा-गोरा माणूस नव्हे. त्याचें 'रुप' पुन्हां बाकी उरतेच! ते ओळखणे म्हणजे चैतन्य ओळखणें. त्याचा शोध म्हणजे एका कलाकृतीचा जन्म. त्याचा परिचय म्हणजे कलांच्या उगमांचा परिचय ! त्या परिचयाचे वेड कलावंतांना असते. असलेच पाहिजे. कारण ह्या चैतन्यमय जगाचा त्याचा शोधच अखेर ह्या सृष्टीला जीवनाची प्रेरणा देणार आहे.

आज समोर असंख्य दिवाळी अंक पडले आहेत. अनेक कलावंतांनीं त्यांत ह्या "चैतन्याचा शोध" घेतला असल्याचे म्हटले जाते (व अंशतः तें खरेंही असते) ह्या चैतन्याच्या वेडानें (कदाचित) दिवाळी अंकाचे लौकिक मोल वाढेल (कांहींना तें जडही वाटेल) पण जीवनाचें मोल मात्र निःसंशयच वाढेल. एका 'अलौकिका'चा साक्षात्कार घडेल. तो घडविणें हीच तर कलांची प्रतिज्ञा असते, नाहीं का?

–संपादक






## थोरांची शाबासकी

स. न. वि. वि.

बहुतेक सर्व दिवाळी अंक कमी अधिक वाचून पाहिल्यानंतर तुम्हांला लिहावेसे वाटतें की, माझ्या मताने 'दीपावली'चा पहिला क्रमांक लावावा लागेल. इतका उत्कृष्ट अंक काढल्याबद्दल तुमचें मनःपूर्वक अभिनंदन केल्यावांचून रहावत नाहीं!

'दौलत' स्नेहांकित,
पुणें ९ **ना. सी. फडके**

## इंद्रधनुष्यच !!

स. न. वि. वि.

हार्दिक अभिनंदन! दीपावलीचा अंक सर्वांगसुंदर आहे. चित्रं, व्यंगचित्रं नि सचित्र साहित्य दर्जेदार नि घाटदार! आमच्यासारख्यांना नवकलेचं वावडं! त्यामुळं आपल्या वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीनं काढलेली रंगीत चित्रं आल्हाद-दायक वाटली. सजावट, रचना, नाविन्य, टंच छपाई व उत्कृष्ट साहित्य यामुळं अंकाला इंद्रधनुष्याचं लोकोत्तर स्वरूप आलं आहे. एका हातीं या सर्वोत्तम अंकाचा 'गोवर्धन' पेललांत त्याबद्दल धन्यवाद.

**शिवाजी पार्क,** आपला,
**मुंबई २८** **वसंत देशमुख**

## ओजस्वी युद्ध-चित्रमाला

स. न. वि. वि.

आपण प्रेमपूर्वक पाठविलेला 'दीपावली'चा अंक पोंचल्याबद्दल अत्यंत आभारी आहे. दीपावलीच्या दिवाळी अंकांत दरवर्षी आपली अद्वितीय कलाप्रतिभा नव्या उन्मेषानें बहराला आलेली पहायला मिळते आणि मन प्रमुदित होते. युद्धजन्य परिस्थितीवरची आपली चित्र-माला ओजस्वी वाटली, त्याचप्रमाणें महाराष्ट्र गीताचे चित्रीकरण मार्मिक आहे.

**शनिवार पेठ,** आपला,
**पुणें २** **भय्यासाहेब ओंकार**




## वैशिष्ट्यपूर्ण संपादन

स. न. वि. वि.

आपण दीपावलीच्या प्रत्येक अंकाचें वैशिष्ट्यपूर्ण संपादन करीत आहांत व नवीन नवीन लेखकांना प्रकाशांत आणित आहांत याबद्दल आपले अभिनंदन करावे तेवढे थोडेच. आज मुद्दाम पत्र लिहिण्याचें कारण म्हणजे ऑक्टोबरच्या अंकांतील आपले संपादकीय व काश्मीरवरील ले. क. रा. ह. लिमये यांचा उद्बोधक लेख. आजच्या प्रसंगी "रुद्रास आवाहन" अत्यंत आवश्यक आहे व भारतीय स्वातंत्र्य व अस्मिता जर टिकावयाची असेल तर वेळीं "रुद्रावतार"च प्रभावी ठरेल. पण प्रत्येक अवताराला अनुकूल असे वातावरणही लागते व त्याची पार्श्वभूमि ले. क. लिमये यांच्या लेखांत समतोलरीत्या विशद केली गेली आहे.

भारतीय जवानांनी १८५७ ते १९६५ च्या काल खंडांत निरनिराळ्या रण-क्षेत्रांत जें कांहीं उज्ज्वल असें कार्य केले असेल अशा पराक्रमाचे साधार लिखाण आपण जर ले. क. लिमये यांच्या लेखणी-द्वारे प्रसिद्ध केले तर नवीन पिढीला एक उत्कृष्ट वाङ्मय मिळवून दिल्याचें त्यांना व आपल्याला सार्थक मिळेल. आपण व श्री. ले. क. लिमये या माझ्या सूचनेचा विचार कराल अशी मी आशा करतो. आपला,

**शारदाश्रम** **डॉ. आजगांवकर**
**दादर, मुंबई २८**

## अंतर्बाह्य सुरेख अंक

स. न. वि. वि.

जाहिरातीबरहुकूम दिवाळी अंक काढून आपण इतर दिवाळी अंकांचा रोष ओढून घेतां आहांत, कारण हल्ली दिवाळी अंकाची जाहिरात ही 'शो-केस'-मधल्या वस्तुसारखी झाली आहे— बाहेरून आकर्षक, आंतून पोकळ. त्यामुळें ह्या वर्षीचे बहुतेक दिवाळी अंक पोकळ (आणि पाणचट) झाले आहेत. परंतु आपल्याला ही 'ट्रिक' अजून जमलेली दिसत नाहीं, म्हणूनच आपला दिवाळी अंक अंतर्बाह्य आकर्षक झाला आहे.

आपल्या कुंचल्याचा जोर यंदा विशेष जाणवला (कदाचित् युद्धामुळें असेल) योग्य रंगसंगती व युवतीचा (भलताच) मोहक चेहरा ह्यामुळें मुखपृष्ठ चित्तवेधक झालं आहे. आंतील रंगविलासी चित्रें पातळ कागदावर छापूनही उच्च पातळीची आहेत. विशेषतः नायिका—'अहाहा!'

श्री. भावे ह्यांची 'शिरीन' कथा एकदम 'टॉप'. अगदीं त्या नायिकेसारखी 'उंची' आहे तिला. त्यामुळें श्री. पत्की ह्यांची कथा चांगली असूनही, मन पुनः पुन्हां 'शिरीन'कडे वळतें. श्री. अरविंद गोखले ह्यांनीं गेल्या दोन वर्षांतील 'दीपावली'तील आपला लौकिक यंदा सांभाळला नाहीं. श्री. भोबे ह्यांनीं गेल्या-वर्षीपेक्षां खूप चांगली मजल मारली आहे. बाकीच्या इतर कथा इतर दिवाळी अंकांतून वरचढ ठरल्या असत्या, इतक्या सरस आहेत. पण 'दीपावली'त सगळे लेखक I. A. S. (Important And Solid) च्या तयारीनें लिहितात! म्हणून इथें 'जरा अवघड' जातं!

साहित्यिकांना आपण भरपूर स्कोप देऊनही त्यांनीं 'अविस्मरणीय स्त्री' अविस्मरणीय निश्चित केलेली नाहीं. त्यांतल्या त्यांत रमेश मंत्री 'मंत्री' ठरावेत!

विनोदांत श्री. पु. ल. देशपांडे ह्यांचा प्रदीर्घ लेख जुन्या पी. एल्. ठशाचा नसला तरी थोडीफार करमणूक करणारा आहे.

श्री. काकांची 'स्टाईल' कायम आहे. कॉंग्रेसशीं हल्लीं त्यांनीं 'फ्री-स्टाईल' सुरू केल्यामुळें त्याचा हा परिणाम असेल. धन्यवाद.

पुन्हां एकदां मी दर्जेदार अंकाबद्दल आपल्याला धन्यवाद देतो; व यंदा इतर दिवाळी अंकांची 'प्रगती' लक्षांत घेऊन, 'दीपावली'ला जशी 'प्रगती' करायची आहे कीं नाहीं ह्याचा आतांपासून विचार करावा, ही नम्र विनंती. कळावें.

आपला,
**मुलुंड** **दि. श्री. कराडकर**

## पै नू पैची वसुली

स. न. वि. वि.

यंदाच्या दिवाळी अंकांच्या जाहिराती वाचल्या. तीन रुपये हा दर लोकमान्य झालेला दिसला. आपण साडेतीन रुपये ही किंमत जाहीर केली तेव्हां आपल्या धाडसाचें कौतुकही वाटले व दिवाळी अंकांच्या रुपानें होणाऱ्या वार्षिक लूट-मारीबद्दल संतापही आला. आणि अंक बाजारांत आल्यावर तर संताप वाढला. कुणीं शंभर पानीं अंक तीन रुपयांत खपवले तर कुणी शंभर पानी अंकांना अडीच रुपये भाव लावला. ते सर्व पाहून जरा उद्वेगानेंच आपला अंक हातीं घेतला. जवानांना उद्देशून लिहि-लेल्या अर्पण पत्रिकेपासून वाचायला सुरुवात केली. मोठ्या अटीतटीनें अंक वाचला. चित्रें, विगचित्रें पाहिली आणि अक्षरशः पै नू पैची वसुली झाल्याचें समाधान झालें. वाचकांच्या पै नू पै चे हे मोल आपण ध्यानीं घेतलें ह्याबद्दल आपलें अभिनंदन! बंडल अंकांच्या जमान्यांतही खऱ्याला मरण नाहीं ही खात्री वाळगावी.

**रामबाग,** आपला,

**कल्याण** **उमेश के. सहस्त्रबुद्धे**

## पु. लं. ची घरेंच घरें !!

दिवाळी अंकांचा बादशहा हे बिरुद 'दीपावली'नें अक्षरशः खरें केलें आहे यंदा. मोठ्या लेखकांचीं नांवें सगळ्याच अंकांतून दिसतात. पण त्यांचे मोठे साहित्य मात्र निवडीअंती आपल्याच अंकांत गवसतें. पु. ल. देशपांड्यांनीं तर कहरच केलाय्! पानापानांवर त्यांनीं उभारलेल्या घराघरांतून आम्हीं मोठ्या मजेनें हिंडून आलों. कांहीं ठिकाणीं थांबलों. रेंगाळलो. डोळे पुसले, तर कांहीं ठिकाणीं ओल्या डोळ्यांनीं हंसलोही. आपण घरोघरी नुसतेंच जातो. पण त्या घराघरांतली 'प्रकृति' अशी एखाद्या जादुगारालाच गवसतें. वामन चोरघडे ह्यांची 'ख्याल' ही तर माझ्या मतें यंदाची सर्वोत्कृष्ट गोष्ट ठरावी. 'परदेशांत भेटलेल्या स्त्रियां'त मला सदानंद रेगे, रमेश मंत्री, अरविंद गोखले ह्यांचे स्त्रीदर्शन आवडलें. गोखल्यांच्या गोष्टीनें एक अगदीं नवी समस्याच जणुं उभी केली आहे. युद्धचित्रें, विगचित्रें, नाट्यो-त्सव, पत्रकार टॅवलो, विडंबन गीतें आणि 'रंगीत चित्रें' हें सारें 'मौलिक' तुम्हीं एकत्र कसं काय करूं शकतां ह्याचें आश्चर्य वाटतें.

पण "बादशहाला काय उणें" असा विचार मनांत येतो. अभिनंदन.

**सांताक्रुझ,** आपला,

**मुंबई ५५** **विजय कुलकर्णी**

## स्त्रिया (आम्हांलाही) आवडल्या

स. न. वि. वि.

मराठी लेखकांना परदेशांत भेटलेल्या (खरंच भेटल्या कां हो ? कां आपलं केवळ इच्छारंजन?) स्त्रिया वाचल्या. त्याची जाहिरात ऑक्टोबरच्या 'दीपावली'त वाचली तेव्हांपासून उत्सुकता वाटत होती. एक नवा प्रयोग म्हणून कुतुहल होते. त्या स्त्रिया आवडल्या. तरुण आस्चीही आवडली. आणि म्हाताऱ्या अनामिकाही आवडल्या. अच्युत बर्वे यांना तिकडेही नेमकी भारतीय स्त्री भेटली काय ? गोखले, मंत्री, चित्रे, रेगे यांना भेटलेल्या स्त्रिया चटका लावून जातात. स्त्रीची इतकी वेगवेगळी रुपें ह्या एकाच मालेंत पहायला मिळतात. एक चांगला उपक्रम केल्याबद्दल अरविंद गोखल्यांचे व आपलें मनःपूर्वक अभिनंदन (अर्थातच हें सारें खरेंखुरें घडले आहे असें गृहित धरून).

आपला,

**ठाणें** **सदानंद शेवडे**

## अवर्णनीय आनंद !

स. नं. वि. वि.

यंदाच्या दिवाळीच्या निमित्तानें, घराकडून कांहीं निवडक दिवाळी अंक मला पाठवण्यांत आले. त्यापैकीं एक 'दीपावली' आहे.

फार दिवसांनीं किंवा महिन्याने म्हणा, निवडक व ताजे मराठी, आपल्या दिपावली अंकांत वाचण्यांत आल्यानें फार समाधान वाटलें.

मराठी वाचण्याचा योग इथें क्वचित्च येतो. अशा ठिकाणीं, पु. ल.चा वजनदार लेख, गोखले, बर्वे, भावे इत्यादींच्या कथा; कुसुमाग्रज, बोरकर यांच्या कविता इत्यादि वाचण्यांत जो आनंद मिळाला तो केवळ अवर्णनीय होता.

इथें आपल्या संपादकीय व इंद्रधनुष्य कलाकृतिचा मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो.

ह्या छोट्या पत्राद्वारें मी आपलें अभिनंदन करतो. आपला,

11 JAT **ले. अरविन्द पाटील**

C/o 99 A.P.O.

## नवी नांवे, चांगलें साहित्य

स. न. वि. वि.

कुठल्याही दिवाळी अंकाची जाहिरात न वाचतां मी त्यांतील लेखकांची यादी म्हणून दाखवूं शकते. ती यादी बहुधा छापूनच ठेवलेली असते असे मला वाटते. कांहीं नवीन नांवें वाचली कीं बरें वाटते. नवीनांचेही चांगलें हुडकून काढून दिवाळी अंकात देण्याचें धाडस आपण यंदा केले आहे. ना. व्यं. देशपांडे, सुरेश वेंगुर्लेकर यांच्या कथा मुद्दाम अपेक्षेनें मी वाचल्या. आणि मन अक्षरशः हललें. दोन्हीं कथा मला फार आवडल्या. त्यांना मोठा न्याय दिल्यामुळें सिद्ध झालेलें आपलें संपादकीय मोठेपणही मला आवडलें. गुणि गुणंवेत्ति हेंच खरें! ! ह. शि. खरात. हे एक यंदाचे चांगले फाइंड हं! त्यांच्या जोशानें मजा आणली.

**नवी पेठ,** आपली,

**पुणें** **सुलभा मेहेंदळे**

## हृद्य संगीत

स. न. वि. वि.

ऐन दिवाळीतही भकास मृत्युकथा, भयंकर भूतकथा, साहेबी हेर (वा धनंजय) कथा, चोरट्या 'शेरलॉक' कथा, रुक्ष व बटबटित अशा तथाकथित नवकथा सादर करणाऱ्या जमान्यांत आपण मात्र निवडक पण चांगल्या संगीतप्रधान कथा दिल्या आहेत. भोबे यांच्या कथेतली चांदची कोठी 'सजीव' झाली आहे. जितेंद्र अभिषेकींच्या गायकी बैठकी प्रमाणेंच त्यांच्या कथेची बैठकही उत्तम साधली आहे. प्रभाकर अत्रे यांच्या कथेंतील गायकी बेहोषी लौकिक प्रीति कल्पनांच्या पलिकडे घेऊन जाते. ह्या तीन्हीं कथा तशा असफल प्रीतीच्या आहेत. पण (कदाचित् त्यामुळेंच) त्या उत्कट झाल्या आहेत. संगीताच्या पार्श्वभूमीनें तीन्हीं कथांत जीव ओतला आहे. त्या कथांची भाषा हीही जणुं सुरांचे लेणें लेऊन आल्यासारखी वाटते. यंदा अंकातल्या पुष्कळशा कथांनाही संगीताची नांवे आढळतात. (ख्याल, सावन घन गरजे) एनी प्लॅन्ड एफर्ट?

**शिवाजी पार्क,** आपला,

**दादर** **कुमार गोगटे**










# नमो युद्धाय:

–द. श्री. मराठे

**युद्धें हें नेहमीं विनाशकच मानण्याची पद्धत आहे. तशी तीं असतातही. पण प्रत्येक युद्ध कांहीं नवीं मूल्यें, नवे सिद्धांत, नवें तत्वज्ञानही सृष्टीला देऊन जात असते कीं, ज्याच्या प्रकाशांत 'नवा मानव' घडत असतो. त्याचा 'कायाकल्प' घडत असतो.**

**चीन पाकिस्तानी युद्धाच्या पार्श्वभूमीवर घडूं पहात असलेल्या नव्या (भारतीय) मानवाची ही कथा (आणि व्यथाही)**

**स्वातंत्र्य**प्राप्तीनंतर भारताचा इतर राष्ट्रांशी जो संघर्ष झाला त्याचे आपल्या राष्ट्रावर काय परिणाम झाले असें जर कोणी विचारले तर सर्वसामान्यत: एक उत्तर मिळते आणि ते म्हणजे असे कीं, जग आपण समजत होतो तसे नाहीं. आणि आपले कांहीं तरी चुकते आहे याची जाणीव आम्हांला झाली. नक्की काय चुकते हें मात्र कळत नाहीं. काय चुकते आणि काय बिघडते याची जाणीव झाली म्हणजे पूर्वी ज्या गोष्टी महत्त्वाच्या वाटत होत्या त्या मग महत्त्वाच्या वाटत नाहींशा होतात. हल्लींच्या भाषेंत बोलावयाचे म्हणजे जीवनांतील जुनीं मूल्यें ढांसळू लागली आहेत आणि नवी मूल्यें कोणती ठेवावीत हें कळत नाहीं असें झाले आहे.

जग जे चाललेले असते ते सनातन नियमांप्रमाणें चाललेले असते. माणसें काय एका तऱ्हेनें वागत होती आणि आज लगेच दुसऱ्या तऱ्हेनें वागावयास लागली आहेत असें कधींच होत नाहीं. असें झाल्यासारखे जे आपल्याला वाटते त्याचे कारण मनुष्य स्वभावा-बद्दल आपण आपल्या कांहींतरी विकृत कल्पना करून घेतलेल्या असतात आणि प्रसंगांनीं आपल्या कल्पना चुकीच्या ठरल्या म्हणजे मग आपण स्वत:खेरीज बाकी सगळ्या जगाला दोष द्यावयास निघतो, अमक्याने विश्वासघात केला, तमक्याने विश्वा-सघात केला असे म्हणणाऱ्यांच्या फार क्वचितच लक्षांत येते कीं, ज्यांच्यावर विश्वास टाकावयास नको होता त्यांच्यावर आपण टाकला. समजा लक्षांत आले तरीसुद्धां आपले चुकले असें कबूल करण्यापेक्षां लोकाचें चुकले असें म्हणणे नेहमीं जास्त सोयिस्कर असते व आपण नेहमीं दुसऱ्याला दोष देत असतो.

आपण आपली मूल्यें भलती ठेवली म्हणजे ती चुकीची आहेत हे आपल्याला दाखवून देण्यासाठीं परिस्थितीचे तडाखे बसतात. ते तडाखे वारंवार बसावयास लागले म्हणजे आपण गोंधळून जातो. दोन तीन गोष्टींचा आपण विचार केला म्हणजे मग असें होणें कसे अपरिहार्य असते हें आपल्याला पटेल. दुसऱ्याच्या मालकीच्या गोष्टींचा आपण अभिलाष केला नाहीं म्हणजे वादाचे एक कारण नाहींसे होते. येथपर्यंत ठीक झाले. पण आपण परस्वाकडे पाप दृष्टीनें पाहिले नाहीं म्हणजे वादच उद्भवण्याचे कारण नाहीं आणि वाद उद्भवतच नाहींत असा सिद्धांत त्यावरून बसवितां येत नाहीं. हा सिद्धांत जर आपण बसविला आणि जर आपण स्वत:ची अशी समजूत करून घेतली कीं, आमच्या मनांत पाप नाहीं तेव्हां दुसरे आमच्या वांटयाला कां जातील? तर हा सिद्धांत अगदीं भोळसटपणाचा आहे असें कोणताहि व्यवहार चतुर माणूस आपल्याला सांगेल. कारण व्यवहारांत आपल्याला पावलों-









अनुक्रमणिका

# दिवाळी !!!

असें म्हणतात कीं

**कांहींची वाजली । कांहींची गाजली**
**कांहींची भलतीच आपटली (म्हणे)**

पण

**आम्हांस नम्रपणे कळविण्यास आनंद होतो कीं आमचा यंदाचा दिवाळी अंक मात्र दुसऱ्याच दिवशीं स्टॉलवरून बेपत्ता झाला. आम्ही 'स्टुडियों'त शोधला. बऱ्याच सुहृदांच्या मागणीवरून ठिकठिकाणीं शोध घेतला. त्याचा शोध आम्हांस लागला आहे**

## यंदाचे सारे अंक

## मराठी साहित्यकलारसिकांच्या घराघरांत विराजमान झाले आहेत

### या रसिकांचे मनःपूर्वक आभार !

कागदाच्या टंचाईमुळें मोजक्याच प्रति काढल्या असल्यानें आधीं मागणी नोंदविणारासच आम्हीं अंक पुरवूं शकलो. मागण्या ऐन वेळीं पुष्कळ वाढल्या त्यामुळें बऱ्याच एजंटांनाहि नकार द्यावा लागला. बऱ्याच जणांचा गैरसमज झाला. पण हा गैरसमजही 'दीपावली'-वरच्या त्यांच्या प्रेमाचा, विश्वासाचाच निदर्शक असल्यानें ह्या साऱ्या एजंटांचे, रसिक वाचकांचे आम्हीं क्षमा याचनापूर्वक आभार मानतो.

**व्यवस्थापक**

पावली असें दिसतें कीं, अगदीं निष्पाप आणि अगदीं सरळपणानें वागणाऱ्यांच्यावर नेहमीं भांडणें लादली जातात. अगदीं आपल्याला साधी गोष्ट म्हणून असें म्हणतां येईल कीं, खाष्ट माणसांच्या सहसा कोणी वाटेला जात नाहीं. आणि जे गरीब असतात त्यांना नेहमीं इतर लोक दडपावयास पाहतात. ही अगदीं साधी गोष्ट आहे. पण राजकारणांत ज्यावेळीं पुढारी लोक आपली सदिच्छा आपल्या संरक्षणासाठीं पुरी आहे असें म्हणतात त्यावेळीं तो शुद्ध भोळेपणा आहे हें सर्वसामान्य लोकांच्या लक्षांत येत नाहीं. त्यांना असे वाटते एवढी मोठी माणसें आपल्याला चुकीची गोष्ट कशी सांगतील ? पण सदाचार माणसांचे रक्षण करतो, हें जर त्रिकालाबाधित सत्य असते तर मग देशांत शासनसंस्था असण्याचीच गरज राहिली नसती.

आपल्याला दुसऱ्या कोणाचें कांहीं नको असले तरी इतरांना आपल्या ताब्यांतील प्रदेश पाहिजे असला तर त्याच्या रक्षणाकरितां आपण लढावयाचे कीं नाहीं ? हा प्रश्न आपल्यापुढें चीननें १९६२ सालीं टाकला आणि पाकिस्ताननें १९६५ सालीं टाकला. दोन्हीं वेळीं जागतिक शांतता कीं, राष्ट्रीय हित ह्यांत जास्त मौल्यवान कशाला समजावयाचे ? हा प्रश्न आपल्यापुढें पडला आणि दोन्हीं वेळां राष्ट्रीय हित हें जास्त महत्त्वाचे असें आपण ठरविलें. अखिल मानवजातीचें हित पाहण्यापेक्षां फक्त आपल्या राष्ट्राचेंच तेवढे हित पाहणें हें संकुचित ध्येय असेल कदाचित, पण राष्ट्रांतील बहुसंख्य लोक तत्ववेत्ते नसतात आणि स्वहिताचा त्याग करण्याची त्यामुळेंच त्यांची तयारी नसते म्हणून तत्त्वें राहतात पुस्तकांत किंवा पुढाऱ्यांच्या मुखामध्यें आणि कृति होतात सामान्य माणसांच्या गरजांचेप्रमाणें. असें होणें हें मनुष्य स्वभावाशीं सुसंगत आहे. एरवीं सामान्य माणसांच्या पुढें जीं ध्येयें व मूल्यें ठेविलेलीं असतात त्यांच्यामध्यें व राजकारणी पुरुषांच्या आचरणांत जी विसंगति उत्पन्न होते त्यामुळें सामान्य माणसें गोंधळून जातात. अशा चमत्कारिक काळांत आपण सध्यां वावरत आहोंत.

आपण अगदीं पंचशीलाला चिकटून बसलो. काय साधले आपले त्यानें ? चीननें आपल्या वागणुकीनें दाखवून दिलें कीं, पंचशील हें एक खूळ आहे. लबाड माणसें ज्याप्रमाणें आपलें हित सोडावयास तयार होत नाहींत, त्याचप्रमाणें राष्ट्रेंसुद्धां कावेबाजपणा करतात, मिळेल ते घेतात आणि पुनश्च मागण्या चालू ठेवतात. राष्ट्रांचे व्यवहार निव्वळ स्वार्थाचे विचारावर आधारलेले असतात. जागतिक शांतता, अखिल मानवजातीचे हित, वगैरे सर्व गोष्टी सोडून देऊन आपण आपल्यापुरतें पाहिलें पाहिजे. आणि हें सुद्धां अत्यंत सावधपणें पाहिले पाहिजे. ही समजूत आतांपर्यंत भारतामध्यें रूढ जरी झाली नसली तरी आतां रूढ होण्याच्या मार्गावर आहे. मानवजातीचे कल्याण हे आतां ढासळलेले मूल्य आहे.

हिंसा हे पाप आहे अशी एक आत्यंतिक विचारसरणी आपल्याकडे फार बलवान झाली होती. भारताच्या युद्धसाहित्याच्या कार-






खान्यांत प्रेशर कुकर्स, एस्प्रेसो कॉफी मशीन्स, सिनेमा प्रोजेक्टर्स वगैरे साहित्याची निर्मिती करावयाची आणि युद्ध साहित्य करण्याचा उद्योग मागें ठेवायचा हें धोरण धरावयाचे यावद्दल त्यावेळचे संरक्षणमंत्री कृष्ण मेनन यांची जवाहरलाल नेहरू यांनीं जाहीर रीतीनें पाठ थोपटली. त्यानंतर अगदीं अल्पकाळांत चीननें आपल्यावर स्वारी केली आणि आपल्या सैन्याला पुरेशी आधुनिक शस्त्रास्त्रें मिळाली नाहींत म्हणून फ़ार आरडाओरडा झाला. राष्ट्राच्या विचारसरणीमध्यें अहिंसेला जे उच्च स्थान होते त्यावरून अहिंसा निश्चित गडगडली. अहिंसा आमचे रक्षण करील हा विश्वास बाळगावयाचा आणि स्वसंरक्षणासाठीं दुसऱ्या कशाची गरज नाहीं असें मानावयाचे ही एक बाजू झाली पण एवढ्यानें भागलें नाहीं. हिंसेचा आणि युद्धाचा आमचा तिरस्कार कोणत्या थराला गेला होता तें पहा.

आम्हीं युद्धप्रेमी नाहीं हें शाबीत करण्यासाठीं म्हणून आणखी काय गोष्टी करण्यांत आल्या त्याचा थोडा विचार करण्यासारखा आहे. हल्लींच्या युद्धांना ज्याला इंग्रजीत Heavy Industries म्हणून म्हणतात त्या देशामध्यें फार विकसीत झालेल्या असाव्या लागतात. त्या जर तशा नसल्या तर युद्ध चालविणें जवळजवळ अशक्य होते. आपण अशी कारखानदारी वाढूंच दिली नाहीं म्हणजे आपल्यावर युद्धखोर राष्ट्र आहोंत असा आरोप कोणी करावयासच नको. आपल्या पहिल्या दोन पंचवार्षिक योजना जर पाहिल्या तर त्याच्यामध्यें शेतीचा विकास करण्याचे प्रयत्न दिसतात. पण मोठी कारखानदारी वाढविण्याचे अगदीं कटाक्षानें टाळलेले दिसते. युद्धाला आपण असमर्थ असलो म्हणजे मग आपल्यावर युद्धखोरीचा आरोप कोण आणि कसा करणार? एवढी आपली शांतताप्रियता अतिरेकाला गेली होती. भारत हे शांतताप्रिय राष्ट्र आहे असें लोकांनीं म्हणावे हे जे आपले पूर्वीचे ध्येय होते त्याला पाकिस्ताननें चांगलाच धक्का दिला. आतां लोक आपल्याला काय म्हणतात, शांतताप्रिय राष्ट्र म्हणतात कां युद्धखोर राष्ट्र म्हणतात याची पर्वा न करतां आपण आपल्या हिताच्या दृष्टीनें युद्धासाठीं सदैव सज्ज असलें पाहिजे ही जाणीव थोडी थोडी डोकावू लागली आहे. आतां मोठाली कारखानदारी आपण निर्माण केली पाहिजे अशी इच्छा उत्पन्न झाली आहे आणि तशा योजना करण्याची भाषा बोलण्यांत येऊं लागली आहे.

गेलीं पंचेचाळीस वर्षें आपल्यापुढें जें ध्येय ठेवले होते तें अध्यात्माचे असें म्हणावयास हरकत नाहीं. सुख कशांत आहे तर समाधानांत आहे. समाधान कशानें होते तर आपल्या इच्छा अगदीं मर्यादित ठेवल्यानें होते. इच्छा मर्यादित कशा ठेवावयाच्या तर साधें जीवन जगून. साधे जीवन कशाला म्हणावयाचे तर ज्याच्यामध्यें कृत्रिम गोष्टींना फारसा वाव नाहीं. निसर्गांत

## अभिवादन

तझ्या स्मृतींचा सुगंध लेवून
उद्यानांत फुलतो गुलाब
मैदानांत मुलें नाचतात,
जगाच्या अंगणीं घुमतात
शांतीचीं कबुतरें
आणि—
भारतांत पेटतात
लक्ष लक्ष मशाली
उजळून टाकण्यासाठीं
——अवघें अवनीतल !!
त्या तेजाळ स्मृतीला अभिवादन!!

—प्रभाकर अत्रे



'सेबर जेट्स'चे कर्दनकाळ

सांपडणाऱ्या वस्तु आणि त्यापासून अल्प आयासानें निर्माण होणाऱ्या गोष्टी याच तेवढ्या वापरावयाच्या म्हणजे आपले जीवन साधें झाले. याचाच अर्थ गरजा अगदीं कमी करावयाच्या गरजा कमी केल्या म्हणजे मग काय काय नको याची आपल्याला मोठी यादी केली पाहिजे. जनलज्जेस्तव एक लंगोटी लाविली, फार फार झाले तर त्याच्यावर एक लुंगी गुंडाळली म्हणजे पोषाखाची गरज संपली. यांत सुद्धां आणखी साधेपणा आणावयाचा म्हणजे हातानें सूत कातून त्या हात सुताचे हातमागावर केलेले वस्त्र वापरले म्हणचे साधेपणाची कपड्यांच्या बाबतीतील परमसीमा गांठली असे म्हणावयास हरकत नाहीं. बैलगाडी वापरणें म्हणजे सुद्धां हराम आहे असें म्हटले म्हणजे मग जन्मभर आपल्या खेड्यांत व फार झाले तर जवळपासच्या दोनतीन खेड्यांत जावयाचे. याच्याबाहेर कोणाशीं दळणवळण नको आणि नव्या विचारांचा व आचारांचा आघात व्हावयास नको. हें ध्येय आपल्या पुढें ठेवले म्हणजे मग हिंदुस्थान हा खरा खेडेगांवांचा देश. अशा जीवनाला तपोवनांतील जीवन म्हणावयाचे आणि भारत हा अशा तपोवनांचा देश झाला पाहिजे ही आमच्या पुढाऱ्यांची महत्त्वाकांक्षा.

जीवनातील साधेपणाचे हें जे मूल्य त्याला लोकांच्या सुखलोलुपतेमुळें सुरुंग लागतच होता पण महापुरुषांच्या सतत चाललेल्या उपदेशामुळें हें मूल्य कांहींसें जीव धरून होते. या मूल्याला शेवटचा धक्का दिला तो या पाकिस्तानच्या युद्धामुळें. शत्रूचें हृदयपरिवर्तन घडवून देशाचें संरक्षण करूं ही भाषा गेली. नाहीं म्हणावयास अजून एखादे राजकारणी मुनी असे म्हणतात कीं, भूदान, ग्रामदान चळवळ यशस्वी करून दाखवा म्हणजे सबंध चीन तुमच्या पायाशीं लोळण घेत येईल. या युद्धामुळें असें झालें आहे कीं, या उदात्त विचारांना योग्य ती प्रसिद्धी देण्याइतकी वृत्तपत्र व्यवसाय करणाऱ्यांचीं डोकीं ठिकाणावर नाहींत. नाहींपेक्षां चिनी लोकांना आपल्या पायां पडावयास लावण्यासाठीं या युक्तीचा प्रचार त्यांनीं चांगलाच केला असता. या युद्धामुळें आपण स्वतंत्र राष्ट्र म्हणून मानानें जगू शकू कां नाहीं हा प्रश्न लोकांच्या पुढें आ वासून उभा राहिल्याकारणानें भारताचे तपोवन करण्याचे ध्येय अगदींच मागें पडले. सध्याची युद्धें ही यंत्रचलित असल्यामुळें लोकांचीं डोकीं आतां यंत्रें किती करतां येतील आणि उत्पादन कसें वाढवितां येईल इकडे लागली आहे. टकळी, चरखा, हातमाग, सुताचे वेळू, हृदयपरिवर्तन, अहिंसा हे शब्द आतां कोणाच्या तोंडांत तर येतच नाहींत, पण मनांत तरी येतात कीं, नाहीं याची शंकाच आहे.

सर्व तऱ्हेच्या यंत्रांना विरोध करणें, यंत्रांचा वापर करणाऱ्यांना तुम्ही कृत्रिम जीवन जगतां, असे जे हिणविण्यांत येत असे ते आतां बंद झाले आहे. आतां यंत्राचा विटाळ मानण्याचे युग गेले आणि ते युग गेले या गोष्टीवर पाकिस्तानच्या युद्धानें शिक्कामोर्तब केले. आतां प्रत्येक व्यक्तीनें टँक फंडाला पैसे द्यावेत आणि भारतीय सैन्याला आणखी रणगाडे मिळावेत यासाठीं कारखाने उभारले जावेत व त्या कामीं हा फंड वापरण्यांत यावा अशी सूचना केल्या जातात. केशरी साडी परिधान करून, शत्रूशी मुकाबला करावयास लाठी तीर्थावर आपले देह ठेवण्यासाठीं महिलांचीं पथकें तयार करण्याचें कोणाच्या मनांतच येत नाहीं. पाकिस्ताननें आक्रमण मागें घेतलें नाहीं तर आम्हीं मरणांतिक उपवास करूं अशा धमक्या देणारे कोणी वीर पुढें येत नाहींत. कराचीला अथवा रावळपिंडीला जाऊन सत्याग्रह करूं नाहींतर परत तोंड दाखवावयास येणार नाहीं अशा भीष्मप्रतिज्ञा करणारे लोकच निर्माण होत नाहींत याचा अर्थ जुनीं मूल्यें ढांसळलीं, ढांसळलीं अगदीं साफ गडगडली असाच अर्थ करावयास नको कां ?

( पृष्ठ ५१ वर पहा )



अनुक्रमणिका










अनुक्रमणिका



'पैशानें सारीं
सुखें विकत घेतां
येतात' असं म्हटलं जातं.
-पण तिचा अनुभव
मात्र तशी ग्वाही देत
नव्हता. कां ?




-पद्माकर चितळे

**आजारपणासारखं** सुख कशांत असेल ? अंतर्मुख होऊन आजारपणांतच विचार करतां येतो. माणूस स्वत:विषयीं विचार करतो तो आजारपणींच. पूर्वग्रह नष्ट होतात. सुख दु:खांचं, घटनाचं मर्म कळतं. यास्तव एखाद्या घटनेनें आनंद झाला, सौंदर्याचं दर्शन झालं म्हणजे मी अधिकचअस्वस्थ होतो. शांततेंत मला वेदना जाणवायला लागते. प्रेमांतील ढोंग दिसतं. सेवेंतील त्याग दिसत नाहीं. त्यामागची अपार वेदना दिसूं लागते. मानवी जीवनाच्या सुख दु:खाचा अर्थ स्पष्ट दिसूं लागल्यानें घोपटमार्गी विधान करणं मी सोडून दिलं आहे. याचा परिणाम असा झाला एखाद्या स्त्रीबद्दल लोक चर्चा करूं लागले, नको तें बोलूं लागले म्हणजे ती स्त्री मला जास्तच आवडूं लागते. जीवनाचे आमचे सिद्धांत ठशासारखे झाले आहेत. व्यवहारी झाले आहेत. ती भिंगं फोडण्याची मला संवय झाली आहे. मित्रांत मी अप्रिय झालों आहे. पण माझा नाईलाज आहे. या क्षणाला पहाना. दवाखान्यांतील वार्ड सहा खाटांनीं भरला आहे. माझ्या खाटेशीं घंटेचं बटण आहे. त्या दूर कोठेंतरी वाजत आहेत. परिचारिका रबरी बूट चुटचूट वाजवत धांवत आहेत. सेवेची तत्परता; आजाऱ्यांच्या वेदना, औषधांचा उग्र वास, खिडकीच्या पलिकडे दिसणारी बोनगवेल, पांघरुणाची ऊब, जवळ पडलेली पण वाचाविशी न वाटणारी कादंबरी, जीवन रेंगाळल्याचा भास होत आहे. तें निसटूं नये म्हणून डॉक्टर परिचारिका खपत आहेत. मी ज्या वॉर्डमध्यें झोपलों आहे तो वार्ड बांधण्यास एका दानशूरानें पांच हजार रुपये दिल्याची नोंद भितींत दगड लावून केली आहे. आणि सेवेच्या वातावरणांत मला वेदना होत आहेत म्हणूनच सौंदर्याचा पुरा आस्वाद मला घेतां येत नाहीं. मंदिराची शिल्पकला पाहिल्यावर मी थक्क होतो. पायरीशीं बसलेले महारोगी व भिकारी पाहिल्यावर माझ्या आनंदावर विरजण पडतं. जीवनाचा एकांगी विचार न करतां आल्यानें मी आनंदाला पारखा झालो आहे. पण जीवनाचा गाभा मला कळला आहे.

याचा परिणाम असा झाला कीं उपेक्षित माणसें माझी स्नेही बनलीं. परिचारिकांविषयीं किती बोललं जातं. पुरुषवर्गात नेहमीं म्हणतात परिचारिका सर्व कामांत उपयोगी पडते. असं कुणीं म्हटलं कीं, मला वेदना होतात. निदान आपला अनुभव सांगावा असं वाटतं. मला एकच परिचारिका भेटली. पण ती वेगळी होती.

माझ्या ऑपरेशनमुळें मला कांहीं काल दवाखान्यांतच रहावें लागलें. माझा व तिचा परिचय तेवढांच. पण सहानुभूतीच्या ओलाव्यानें मनामनाचीं दारं उघडतात. स्तब्धता जागी होते. दोन अनामिक माणसं एकत्र येतात.

खूप दिवस झाले त्या घटनेला. आज सुद्धां मी आजारी आहे. दवाखान्यांत आहे. व माझं मन तीन वर्षांपूर्वी भेटलेली ती नर्स शोधत आहे. तिची कहाणी अद्याप मी विसरलो नाहीं. म्हणूनच आजूबाजूला जीवन पकडून ठेवण्यासाठीं धडपड चालूं असतांना मला वेदना होत आहेत. शारीरिक वेदना दूर करण्यासाठीं शास्त्र खपत आहे. आणि मनाची वेदना त्यांना दूर करतां येत नाहींत. त्यावर बँडेज बांधतां येत नाहीं. ही शास्त्रांची शोकांतिका आहे. रक्तस्राव थांबवणं व जखम सुरक्षित ठेवणं बँडेजचं काम आहे. पण असंख्य जखमा तशाच वाहत आहेत. बँडेज बांधण्याची वेदना दिसत नाहीं. त्यांची जखम दिसत नाहीं. ते हात गांठ बांधू लागले कीं, त्या बोटांतून मला त्याग दिसत नाहीं. बँडेज बांधण्याची वेदना दिसूं लागते.

तीन वर्षांपूर्वी एक परिचारिका अशीच भेटली. तिनें स्वतःची कहाणी सांगितली होती. इस्पितळांत जास्त काल रहावें लागल्यानें तिचा व माझा परिचय झाला. तिची पंचवीशीसुद्धां पुरती उलटली नाहीं. तिला जीवनाचं भीषण स्वरूप परिस्थितीनें दाखवलं होतं. पोरसवदा वयांत तिला केवढा अनुभव मिळाला होता. जिचं दुःख तिच्या नवऱ्याला समजत नव्हतं. दीराला समजत नव्हतं. सासू-सासऱ्यांना समजत नव्हतं. उलट तिचा त्याग त्यांना दिसत होता. त्याचंच कौतुक होत होतं आणि तिच्या वेदना मात्र त्यांना कळत नव्हत्या.

एकदां ती अशीच बँडेज बांधायला आली. मलाच संकोच वाटूं लागला. माझ्या शरीरांतील हालचाल तिला समजली असावी. माझा व तिचा परिचय वाढत होता. मी म्हणालो "राहूं द्या मी करतो बँडेज. आपला परिचय झाला मग तुम्हांला जास्तच संकोच वाटेल." यावर तिच्या डोळ्यांत पाणी आलं. स्त्री आणि पुरुष यांच्यांतील संकोचाला ती पारखी झाली होती. माझ्यासारख्या पेशंटमुळें तिला कैक दिवसांत त्याची प्रथमच जाणीव झाली. ती म्हणाली होती, "विवक्षित पेशामुळें संकोच असा उरलाच नाहीं. त्याचा परिणाम असा झाला मी माझ्या नवऱ्याबरोबर रममाण होऊं शकत नाहीं." असं म्हटल्यावर तिच्या डोळ्यांत अश्रू तरळले होते. त्या अश्रूंनीं विवाहाच्या फार मोठ्या समस्येवर, दुःखावर बोट ठेवलं होतं.

स्त्री आणि पुरुष यांच्यांतील रहस्याला ज्यानें गोडी येते त्या संकोचावरच घाला पडला होता. पेशामुळें तो संकोच निघून गेला. नोकरीसाठीं तिनें याची किंमत दिली होती. ती वैवाहिक जीवनाला पारखी झाली. संकोच न उरल्यानें ती नवऱ्याबरोबर रममाण होऊं शकत नव्हती. वैवाहिक जीवन ज्या पायावर कांहीं अंशानें उभं असतं तो कामपूर्णतेचा पायाच उखडला गेला.

तिचं जीवनच एका स्वप्नाळू ध्येयानें प्रथम घेरलं होतं. ती म्हणाली होती, "माझं जीवनच एखाद्या स्वप्नासारखं होतं. वडिलांनीं कुटुंबापुरतंच राहायला योग्य असं घर बांधलं. त्यांची परिस्थिति बरी होती. माझ्या खोलीच्या खिडकीजवळ खुर्ची टाकून बसणं हा माझा आवडता उद्योग होता. सकाळीं बागेंतील दोन खारी झाडावरून सरसर धांवतांना मी रोज बघायची. पावसाळा जवळ येऊं लागला म्हणजे माझ्या आवारांतील झाडावर कावळे घरटीं करायचे. त्याकडे मी एकटक पहात रहायची. घरकुलाची एक स्वप्नाळू कल्पना मला त्याच वेळेस आली होती कीं काय कुणास ठाऊक! बालवयांत त्याचा अर्थ मला कळत नव्हता. क्षितिजावर टेकलेलं आकाश, दिमाखानें वर येणारा चंद्र, माझ्या बागेंतील हिरवी झाडें, बोगनवेल यांला खरंच कांहीं अर्थ असेल का असं मला उगाच वाटे. त्याचा अर्थ मला कळत नसे. मग मला विचित्र स्वप्नं पडत. अल्लाउद्दीनाच्या राजवाड्यांत मला कोणी नेल्यासारखं वाटे.

वय वाढूं लागल्यावर माझं खिडकीशीं बसणं वाढलं, पण अनेक अर्थ कळूं लागले. आजुबाजूच्या सृष्टीचा मी वेध घेत होते. व त्यांत स्वतःला पहात होते. "सॉलीटरी रीपर" कविता वर्गांत शिकवली तेव्हां मी उगाच अस्वस्थ झाले. त्या दिवशीं मी खिडकीशी अशीच उभी होते. पण असं कांहींतरी घडलं व माझी खिन्नता संपली. अंगणांत शिरतांना लोखंडी फाटक होतं. चिमणा चिमणीचं एक जोडपं अगदीं चिकटून बसलं होतं. दोघांनीं चोंचींत चोंच घातली. चिव चिव असा आवाज येत होता. कोठल्या भाषेंत ते बोलत होते समजलं नाहीं. पण लवकरच मी न बघितलेलं दृश्य बघितलं. चिमणी थोडीशी उडाली. तिनें पंख झटकले. चिमणा तिला बिलगून पळाला. आणि संकोचानें मी अस्वस्थ झालें. स्वतःशींच उद्‌गार काढला "इश्श्" व त्या शब्दाचा संपूर्ण अर्थ मला त्या दिवशीं समजला."

इतकं बोलल्यावर ती थोडी थांबली. मी तिच्याकडे बघितलं. त्या तोंडावर अपार वेदना दिसल्या नाहींत. त्या क्षणिक आनंदाचा ठसा कांहीं काल तिच्या मुखावर दिसला, जो कायम हरवला होता. प्रत्यक्ष वेदना सांगायला अद्याप अवधी होता. वाटलं तो क्षण येऊच नये. क्षणकाल आनंदानें भरलेला तिचा चेहरा आणखी पहावा. कांहीं काल त्या स्वप्नाळू धुंदीचा आस्वाद तिला घेऊं द्यावा. पण तिचे शब्द व त्यामागून दिसणारीं चित्रं फिल्मप्रमाणें पुढें सरकूं लागलीं.

ती म्हणाली "स्त्री आणि पुरुष यांच्यांतील विवक्षित संकोचाला मी पारखी झालें आहे. एक प्रसंग आठवतो. माझे वडील सायंकाळीं फिरायला निघाले कीं, काठी घेऊन जात. एकदां त्यांना ती सांपडेना. त्यांनीं आईला काठी आणण्यास सांगितलं अजून सुद्धां आईचा वडिलांच्यापुढें संभ्रम उडतो. ती वेंधळ्यासारखी तशीच आली. तेव्हां ते तिच्या खांद्याला स्पर्श करून म्हणाले, 'अग, ही काठी नाहीं.' आई अधिकच गोंधळली. मी हा प्रकार दाराआडून पाहिला.

स्त्री आणि पुरुष यांच्यांतील संकोच लहानपणापासून माझ्या मनावर बिंबला. हे संस्कार घेऊन मी सासरी आले. तेथील परि-






स्थिति वेताची होती. घरखर्चाची तोंडमिळवणी होणं कठिण जायचं. दीर शिकत होता. मला कांहीं करतां येणार नाहीं कां असं वारंवार वाटायचं. नोकरी करावी असं वाटूं लागलं. घरकाम सांभाळून स्त्रीनें बाहेर पडायला हवं हा उमज मला येऊं लागला. सेवा आणि ध्येयवादाची स्वप्नं मला पडूं लागली. माझा विचार मी नवऱ्याजवळ मांडला. आपली नवविवाहित पत्नी नोकरी-साठीं बाहेर पडणार हे त्याला आवडलं नसावं. पण त्याला संमती द्यावीच लागली. आर्थिक ओढघस्त असल्यानें त्याला नाहीं म्हणतां आलं नाहीं. त्याच्या पौरुषाला तें आव्हान होतं; पण कितीहि झगडलं तरी पैसा अपुराच पडणार होता. श्रमांचीच किंमत द्यावी लागत होती असं नाहीं. भावनांची सुद्धां द्यावी लागत होती. पोटाची खळगी भरण्यासाठीं देहविक्रय करणारी वेश्या व भावना, अपमान, स्वाभिमान यांची किंमत देत जगणारी तुम्हीं आम्ही माणसं यांत तसा काय फरक आहे? अपमान मिळायचा, भावना मुडपायच्या आणि पुढें जायचं त्याच्यामागें लेबल लागलं आहे सेवा व त्याग यांचं!"

बोलतां बोलतां तिचं मन भरून आलं. एक साधी स्त्री जीव-नाचं केवढं तत्वज्ञान सांगत होती. लहानशा वयांत तिला केवढा अनुभव घ्यावा लागत होता. मी तिच्याकडे पाह्यलं. फार वेळ, पाह्यलं तर तिला वाईट वाटेल म्हणून खिडकी बाहेर पाह्यलं. तिनें आवंढा गिळला व ती सांगू लागली—

"माझ्या नोकरीबरोबर घरांतील सारा नूरच बदलला. माझ्या भावनांची त्यांना किंमत राहिली नाहीं. पैशांत अशी काय जादू आहे? माणसाची मनं समजावून त्यापायीं घेतां येत नाहींत. ती बधीर होतात. डॉक्टरी शास्त्रांत मॉर्फियाचं इंजेक्शन देतात. माणसाची मनं तशीच बधीर बनतात. अगदीं दगडासारखी. पैशाच्या मागें लागल्यानें मी पाथरवट झाले आहे. माझ्या नोकरीचा गौरव होतो तो सेवा, त्याग या शब्दानें. माझे सासू सासरे दीर, प्रत्यक्ष नवरा कौतुक करतो. पण मला तें मनोरंजना-सारखं वाटतं. माझ्या भावना त्यांना कळत नाहींत. कळणार नाहींत.

अनोळखी पुरुषांची सेवा करतांना सर्व ठिकाणीं स्पर्श करावा लागत असल्यानें मला लाज अशी उरलीच नाहीं. आणि केवळ यामुळेंच माझ्या भावना उडून गेल्या. रंग उडालेल्या वस्तुसारखं माझं मन झालं आहे. मला आठवतं माझा नवरा न्हाणीघरांत स्नानासाठीं गेला कीं, टॉवेल विसरायचा. अंग पुसायच्या वेळीं त्याला आठवण यायची. 'टॉवेल' असा पुकार द्यायचा. टॉवेल देतांना न्हाणीघरांत डोकवायचा सुद्धां मला संकोच वाटायचा. आज तो संकोच मला पारखा झाला आहे. दुसऱ्यांच्या जखमांवर मी बॅंडेज बांधते व माझी जखम अद्याप वहात आहे.

त्या संकोचाची मला नोकरीसाठीं किंमत द्यावी लागली. माझ्या वैवाहिक जीवनाचा पायाच हादरला. आज मी नवऱ्याशीं समरस होऊं शकत नाहीं. बोथट व थंड भावनांचा स्पर्श त्याला कळतो. मी दमले असेन, मला त्रास झाला असेल असं त्याला वाटतं. अधिकच वेगानें तो माझा हात हातांत घेतो. पण माझ्या अंगांतून त्या क्षणीं तिरस्कार वाहतो. माझ्या नोकरींतील दुःख तो समजू शकत नाहीं. तो प्रेमळ आहे पण घरांत पैशाचा ओघ सुरू झाल्यानें तो नोकरीविषयीं बोलत नाहीं. दवाखान्यांत कृत्रिम सेवेचं नाटक चालतं. ना जिव्हाळा ना नातं! घरांत तसं राहतां येत नाहीं. पण या कृत्रिम वागणुकीचा पगडा माझ्यावर एवढा बसला कीं, नवऱ्याबरोबर मला कृत्रिम रहावं लागतं. संकोचाची किंमत दिल्यामुळें त्याचा हस्तस्पर्श एखाद्या रोग्याच्या स्पर्शासार-खाच वाटतो. त्यालाच तो कवटाळतो. व माझ्या मनांत तिरस्कार जागा होतो. मी दूर होते. नवऱ्याला उत्तेजित करण्याचं सामर्थ्य माझ्याजवळ राहिलं नाहीं. त्याला याची जाणीव नाहीं. पैशाच्या नादाबरोबर माझीं दुःखं बघायला कोणीच तयार नाहीं. आतां दीराला नोकरी लागली आहे. माझी नोकरी सोडून देण्याची भाषाच कोणी बोलत नाहीं. "अजून एक दोन वर्षं बघू" असं म्हणत वर्षं ढकलली जात आहेत. मी प्रत्यही उदासीन बनत आहे. उदासीनता हा मनाचा पक्षघात आहे. जिवंतपणींचा मृत्यू आहे. पण तो कोणालाच दिसत नाहीं. आतां त्यांना दिसतो पैसा व त्याचा नाद! माझ्या मनावर झालेल्या संस्काराला मी मुकलें आहे. स्वप्नाळू अवस्थेंत निर्माण केलेलं घरकुल आतां माझ्यासाठीं राहिलं नाहीं. माझ्या पैशानें मला पाथरवट बनवलं."

क्षणभर तिचे डोळे कोठल्यातरी तेजानें चमकले. माहेरीं अस-तांना कल्पनेंत रंगवलेलं घरकुल तिच्या डोळ्यापुढें उभं राहिलं असावं. पण क्षणभर त्या भावना टिकल्या. दुःखाचा स्थायीभाव ठसा ठेवून जातो. तो तिच्या मुखावर दिसत होता. पांढऱ्याशुभ्र कपड्यामुळें ती मला अधिकच उदासीन दिसूं लागली. मी कल्पनेंत तीं फुलांचं पातळ नेसल्याचं पाहूं लागलों. तेवढ्यांत ती सांगू लागली.



मॉडर्न आर्टची ही प्रतिक्रिया बरं का ?









"माझ्या कहाणीचा तुम्हांला कंटाळा येईल. लेखक, सामान्य लोक, कलावंत, आमच्याकडे वेगळ्या दृष्टिकोनांतून बघतात. जे मला नामंजूर आहे, तेच माझ्या वाट्याला आलं आहे. माझं दुःख थट्टेवारी नेण्यांत येईल. लोक म्हणतील मी जगावेगळी आहे.

नवऱ्याला याची जाण नाहीं. पण तो ओतां मला दुःख देऊं लागला आहे. माझ्या वृत्तीचा थंडपणा त्याला कळला आहे. दिवसेंदिवस तो वाढत आहे. माझं जीवन अधिकच कृत्रिम बनत आहे. तो माझाच संशय घेऊं लागला आहे. मी बाहेर कोणीतरी प्रियकर पाहिला असेल अशी त्याची समजूत झाली आहे. वेळी अवेळीं तो मला दवाखान्यांत भेटण्यासाठीं येऊं लागला आहे. माझा पेशाच असा आहे. ज्या ठिकाणीं सलगीचा नुसता देखावा चालतो. तो पाहूनच त्याला मत्सर वाटू लागला आहे. पेशंटशीं बोलणें, त्याची सेवा करणें, डॉक्टराशीं हंसत बोलणं याचा त्याला मत्सर वाटूं लागला आहे. पण माझं दुःख काय आहे तें समजावून घेण्याची त्याची कुवत नाहीं. माझ्या संसारांतील कडवटपणा वाढत आहे. पण पैशापायीं तो वाटेल ते करायला तयार आहे. पैशाच्या नादामुळें माझ्या वृत्तींचा कडवटपणा तो मुकाट स्वीकारत आहे.

माझा पगार मी घरीं स्वाधीन करते तो आमच्या घरीं देवापुढें ठेवतात. मला त्याचं हंसूंच येतं. वाटतं त्यांना सांगावं. ही श्रमाची पूजा नाहीं. विवक्षित भावना देऊन केलेला सौदा आहे. हा सौदा आतां माझा पाठपुरावा करणार आहे. माणूस एखादी गोष्ट सहज म्हणून करतो व ती त्याच्या मानगुटी बसते."

जास्त कांहीं तिच्याकडून ऐकावं असं मला वाटेना. तिचा व माझा परिचय फार दिवसांचा नव्हता. तिची आंतरिक, खाजगी दुःखं ऐकायचा मला हक्क नव्हता. पण माझ्यांत व तिच्यांत सौहार्द निर्माण झालं. व लपलेलं दुःख सहज बाहेर पडलं. दुसऱ्या एका पेशंटला औषधं देण्यासाठीं ती माझ्यापासून थोडी दूर झाली. तोलून मापून ती औषध देत होतीं सारं कृत्रिम वाटलं. तिचा अवखळपणा, खिलाडू वृत्ति पार नाहींशी झाली होती. औषध ती देत होती. त्या औषधांचा कडवटपणा तिच्या वृत्तींत भिनत होता. दवाखान्याच्या अबाढव्य स्वरूपांत ती मला एखाद्या संसारी स्त्री-सारखी दिसूं लागली. माझ्या कल्पनेचं मलाच हंसू आलं. माझ्याकडे परत येत ती म्हणाली कां हंसलांतसे ?" "हंसण्याचं कारण शोधू नये" "अस्स ! पण सांगा कीं !"

मी माझी कल्पना सांगितली व तिच्या तोंडावर हास्य दिसण्याऐवजीं दुःखच दिसलं. तिने सांगितलं "आतां ते शक्य होईल असं वाटत नाहीं विवक्षित भावना पायदळीं तुडवल्या गेल्या आहेत. डोळे उघडे ठेवून रमणं मला कठीण जाईल. लोक डोळ्यांवर कातडं ओढून जगतात. माझ्या भावना जाग्या असल्यामुळें डोळ्यांवर बँडेज बांधून मला जगतां येत नहीं हो" असं म्हणत ती दूर गेली होती. क्षणकाल मी तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहिलों. डोळ्यांवर बँडेज बांधून तिला जगतां येत नव्हतं ती जगावेगळीच होती. पांढऱ्या कपड्यांतून डोकावणाऱ्या वैराग्यानें, एका पोरसवदा मुलीनें मला सांगितलं होतं डोळ्यांवर कातडं ओढून तिला जगतां येत नव्हतं हेंच तिचं दुःख होतं. ●●●










—अरविंद ताटके



'मरावें परी कीर्तिरूपें उरावें' हें वेगळ्याच अर्थानें सिद्ध करणाऱ्या दुसऱ्या बाजीरावाची ही रंगेल व रसपूर्ण जीवनगाथा— [दिवाळी अंकावरून पुढें चालू]

# दुसरा बाजीराव

**बाजीराव** ब्रह्मावर्तास आला तेव्हां त्याच्यावरोबर १४ हत्ती मोहरांनीं भरलेले अन् १४ हत्ती जवाहीर पुतळ्या अन् सुर्ती रुपयांनी भरलेलें होते. असे एकूण २८ हत्ती त्याच्यावरोबर होते. थोडेबहुत लष्करहि त्याच्यावरोबर होतें. तेथें त्याच्यावर नेमलेल्या रेसिडेन्टाचें नांव होतें कॅप्टन लो. हा सहा वर्षें तिथें रेसिडेन्ट होता. बाजीरावाच्या मृत्युपर्यंत आणखी तीन रेसिडेन्ट त्याच्या दिमतीस होते ते पुढीलप्रमाणें :

कॅ. बेकन——स. १८२५ ते १८२९
मे. मॅनसन —स. १८३० ते १८५०
कॅ. मोलॅंड —स. १८५१

बाजीरावाच्या तेथील तेहत्तीस वर्षांच्या कारकीर्दीची अधिकृत हकिगत सांपडणें कठीण आहे. तथापि भारत इतिहास संशोधक मंडळाच्या १८ व्या वर्षाच्या त्रैमासिकाच्या चौथ्या अंकात त्या संबंधीं आठवणी प्रसिद्ध झाल्या आहेत (स. १९३८ एप्रिल) त्याच्या आधारें बरीच मनोरंजक माहिती सांगता येणें शक्य आहे.

बाजीरावाला ऐश्वर्याची अन् डामडौलाची मोठी आवड. ती त्यानें ब्रह्मावर्तास पुरी पुरवून घेतली. तिथें त्यानें एक उत्तम अन् भव्य राजवाडा उठविला. त्यांतील दिवाणखानें त्यानें आरशांनीं झुंबरांनीं सजविले होते. पडदे काय, रेशमी गालीचे काय, चांदी सोन्याचीं भांडीं काय, हरतऱ्हेचें अलंकार, अंबाऱ्या, मेणे, रथ, पालख्या, कुत्रीं, हरणें, काळविटें वगैरे तऱ्हेच्या सर्व चिजा त्यानें येथें आणविल्या होत्या. पेशवाईत भोगलेली सर्व ऐश्वर्यें त्यानें इथेंहि भोगण्यास कमी केलें नाहीं. त्यामुळें ब्रह्मावर्त म्हणजे जणुं काय एखादी नवीन राजधानीच बनली होती. ब्राह्मणांचा रमणा त्यानें तिथेंहि चालू ठेविला. सुग्रास भोजनें अन् दक्षिणेची वाण तिथेंहि त्यानें ब्राह्मणांना भासूं दिली नाही. त्यावरोबरच गवई, बीनकार, पहिलवान, वगैरे गुणी लोकांचा परामर्षहि तो तिथें उदारपणें घेई. बाळंभटदादा देवधर (१७८०–१८५२) हे प्रख्यात मल्लविद्याविशारदहि त्याच्या पदरीं तिथें होते. एकंदरींत काय पुण्यासारखीच यक्षनगरी त्यानें ब्रह्मावर्तास स्थापन केली अन् तिथें तो मोठ्या डामडौलांत राहूं लागला. राज्य गेल्याची त्याला ना खंत ना खेद !

बाजीरावाला मिळणाऱ्या आठ लाखांपैकीं तीन चतुर्थांश पैसा पदरच्या मंडळींचा पगार चुकता करण्यांत खर्च होई. उरलेला भोजनखर्चासाठीं अन् स्वतःसाठीं तो ठेवी. त्याला तीन खून माफ असत अन् पत्रहि त्याला फुकट धाडतां येई. तेथील इंग्रज अधिकारी त्याला वचकून असत. एकदां तो पुजाअर्चेंत दंग असतांना त्याचा तनखा आला. पण ब्रह्मकर्माच्या वेळीं इंग्रजाचे दर्शन नको म्हणून रागानें तो सर्व पैसा त्यानें नदींत टाकण्याचा हुकूम केला. ही हकिगत कलकत्त्यास समजली तेव्हां त्यावेळीं तनखा घेऊन जाणाऱ्या संबधित इंग्रज अधिकाऱ्याला दंड होऊन तनखा बाजीरावाला पुन्हां मिळाला. धर्मादायाचे वेळीं तो सुर्ती रुपये वापरी. राज्य गेले–घालविले तरी त्याचें दातृत्व गेलें नाहीं. पण त्याची भेट होणें मुष्कील असे. स्त्रियांच्या घोळक्यांत हा असला तर मग भेटीचें नांवच नको. पुण्याकडच्या कोणाहि माणसाची भेट झाली कीं, याचा पहिला प्रश्न असे तो हा : "शनिवारवाडा चांगला आहे



अनुक्रमणिका

ना?" "वाडा चांगला सारवून ठेवला नि श्रीमंत येण्याची वातमी आहे" असें उत्तर एखादा चतुर इसम देई अन् मग बाजीरावाच्या सढळपणाला मर्यादा रहात नसे. एकदां गव्हर्नर जनरलनें त्याला भेटीस बोलाविलें. पण 'आमच्या कचेरींत ठरलेल्या बंगल्यांतच भेटीस यावें' असा निरोप त्यानें लाटसाहेबांस धाडला. वाईट एवढेंच कीं, राज्य गेल्यावर त्याला हा स्वाभिमान सुचला.

बाजीरावाची येथील दिनचर्याहि सांगण्यासारखी आहे. तो रात्री बाराला उठे. नाक धरून बसणारा असा त्याचा लौकिक प्रथमपासूनच होता. अर्थात हें लवकर उठणें त्या लौकिकास साजेसें होतें. नंतर तो विष्णुसहस्त्रनामाचा पाठ म्हणे. गरम पाण्यानें स्नान उरकून सूर्योदय झाला कीं, होमशाळेंत तो अग्निदर्शनास जाई. तिथून मेण्यांत बसून भागिरथीचें कांठीं हा ब्रह्मयज्ञास जाई. वाड्यांत आल्यावर झोपाळ्यावर बसून, भाजीपाले व फळफळावांचे नमुने जी मंडळी आणीत त्यांना हा छोट्या देणग्या देई. भाजीपाले कोवळे असले कीं, याची तबियत खूष होई. कधीं कधीं हा पुरोडाप भक्षण करी. बारा वाजतां भोजन करी. खाशा पंक्तीस १०० मंडळी असत. सगळी मंडळीं धरून दिवसा १,८०० पान होई. रात्रीहि तितकीच मंडळी भोजनास असत. मुखशुद्धीच्या वेळीं हा केळीं खाई. भोजनसमयीं तो पाणी पीत नसे. भोजनोत्तर तीन चार तास झोंपाळ्यावर तो झोंप घेई.

बाजीरावाची भोजनाची पंगतहि नमुनेदार अन् अगदीं रसीली असे. तो स्वतः सोन्याच्या ताटांत जेवी. भोंवताली सोन्याच्या अठ्ठावीस वाट्या अन् तसलेच अठ्ठावीस चमचे असत. हें ताट वाट्या, अन् चमचे ज्या चौरंगावर असत तो रुप्यानें मढविलेला असे. मुलांना जेवणाचें साहित्य चांदीचे असे. सैंपाकाला फोडणी असे तुपाची. दहा भाज्या, दहा चटण्या, कढी, तूप, असें जेवण असे. इतर पंगतींत रोज पुरणपोळी असे, त्यावरून खाशांचे पंक्तींत काय पक्वान्नें असतील त्याची कल्पना वाचकांनींच करावी. दररोज एक शेर केशराचा फन्ना होई. बाजीरावाच्या एकादष्या, उपास तापास अन् चतुर्थ्याहि चालूं असत. दर महिन्यास द्वादशी व चतुर्थीला स्त्रिया व पुरुष मिळून दोन हजारांचें पान होई. ब्रह्मावर्तास राज्य गेल्यावरहि त्याच्या ऐश्वर्याचा हा थाट चालूं होता.

ऐन उमेदींत बाजीरावाचा आहारहि चांगला असे. उतारवयांत तो कमी झाला. भोजन उरकलें कीं, झोप लागेपर्यंत करमणुकीसाठीं त्याच्याभोवतीं बायका-पुरुषांचा गराडा असे. मुखशुद्धीसाठीं हा मक्याची कोवळीं कणसेंहि खाई. नंतर रामटेकच्या कळीदार अशा दहा पानांचा विडा खाई. कलकत्त्याहून त्याच्यासाठीं खास शहाळीं येत तीं वेगळीच!

बाजीरावाला पोहण्याचा नाद होता अन् त्यांत तो चांगला पटाईत होता. मांडी घालून पोहून तो भागिरथीचे तीर पार करी. याच्या देव्हाऱ्यांत एक सुंदर संगमरवरी गणपतीची छोटी मूर्ति असे. पूजेच्या वेळीं तो तिजपुढें रोज एक मोहोर ठेवी. या मूर्तीवर त्याचें पराकाष्ठेचे प्रेम होतें. आतां ही मूर्ति बिठूरच्या डुबे घराण्यांत पहावयास सांपडते.

## पितांत मेले अतां घरोघर



[आज मर्ढेकर असते तर?]

**पितांत मेलें अतां घरोघर,**
**माना पडल्या चढल्यावाचून.**
**पाठीला जरि पोट लागले,**
**रित्या 'बाटल्या' सोडा घालून**
**जे रसायन गुळांत शिजलें.**
**पितांत मेले उचकी देऊन;**
**दिवसा-ढवळ्या रस्तोरस्ती**
**मात्र झिंगती 'दादा' होऊन,**
**सोडायची पण सक्ती आहे;**
**प्यायची पण सक्ती आहे;**
**पोलिसाला पण असती डोळे**
**लांचेन्ने पण;**
**मद्यांक चाळें**
**ओठांवरती एकच गाणें**
**हातभट्टीची! हातभट्टीची!!**
**पाठीला जरि पोट लागलें**
**पितांत मातर् सारे साले!**

बाजीरावाच्या पोशाखांतहि रसिकता असे. येवल्याचें रेशीम अन् चंदेरीचे सूत मिळून त्याचा धोतरजोडा बनलेला असे. ऐन उमेदींत हा रंगीबेरंगी पोशाख करी. उतार वयांत याचा पोशाख पांढरा शुभ्र असे. सणासमारंभात हा भरजरी पोशाख परिधान करी. भोंवतालची मंडळी त्याला, 'गोकुळांत भगवान कृष्ण जन्माला आले.' असे म्हणत. अन् मग खूष होऊन मुक्तहस्तानें त्यांना तो बक्षिसांची खैर करी. त्याला खूष करण्यासाठीं खुपमस्कऱ्यांत नेहमीं स्पर्धा असे. जो जास्त यशस्वी होई त्यास त्याप्रमाणें जास्त बिदागी मिळे. एकदां याचा दत्तक मुलगा नानासाहेब यानें एक बग्गी विकत घेतली. तेव्हां 'जलचराचीं वाहनें कशाला घेतलीं' असें म्हणून त्यानें ती बग्गी मोडून नानास सात हजार रुपयांचा रथ करून दिला. या रथास मोत्यांच्या झालरी होत्या. इंग्रजांचा हा पक्का द्वेष्टा बनला असल्यानें नानासाहेब इंग्रजी शिकला तेंहि याला दाद लागूं न देतां.

बाजीरावाचे ब्रह्मावर्तांचे जीवन असें एकंदरींत भोगमय होतें. राज्य गेले तरी भोग त्याला सुटले नाहींत. अनेक छलछबेल्यांचा









अनुक्रमणिका

उपभोग यानें मनःपूत घेतला असला तरी लग्नाच्या बायकाहि यानें बऱ्याच केल्या. याने एकंदर लग्नें केली अकरा. त्यापैकीं सहा पेशवेपदावर असतांना केलीं अन् पांच ब्रिठूर येथें उरकलीं. याशिवाय रक्षा, नाटकशाळा अन् कितीतरी प्रेमपात्रें होतीं तीं वेगळींच.

१) भागिरथी २) सरस्वती ३) राधाबाई ४) वाराणसी ५) वेणुबाई उर्फ कुसाबाई ६) सरस्वतीबाई ७) सत्यभामा ८) गंगाबाई ९) मैनाबाई १०) सईबाई ११) चितळे घराण्यांतील एक (नांव उपलब्ध नाहीं) अशीं त्याच्या बायकांची नांवें. त्याची पहिली बायको १७९३ मध्यें, दुसरी १७९७त, व तिसरी १८०६ सालीं वारली. यासंबंधीं श्री. य. न. केळकरांनीं आपल्या 'इतिहासांतील सहली' (खंड २, १९६४) ग्रंथात, 'बाजीरावाच्या बायका' या प्रकरणांत पुढीलपणें मार्मिक भाष्य केलें आहे. 'यावेळीं बाजीरावाचें वय ३१ वर्षांचे होतें. म्हणजे ते ऐन जवानींत होते. त्यांची लोकविलक्षण कामासक्ति लक्षांत घेतली असतां त्यांच्या तिन्ही बायकांना तेच भोवले असावेत. त्या बायका बिचाऱ्या, चौदापंधरा वर्षा इतक्याच उमरीच्या असणार !'

तीन बायका निवर्तल्या तरी बाजीराव निपुत्रिकच होता. तेव्हां त्यानें पुन्हां चौथें लग्न (१८०६) केलें. या चौथ्या स्त्रीस फिट्स येत. अन् वारंवार ती आजारीहि पडत असे. जेव्हां तिला मूल होण्याचें चिन्ह दिसेना तेव्हां त्यानें पांचव्यांदा बाशिंग बांधलें. (१८०८) पुढें वाराणसीबाईंना पुत्र झाला तो निवर्तला अन् कुसाबाईची कूस कांहीं प्रसवेना तेव्हां त्यानें सहावें लग्न लावलें. अशा रीतीनें पेशवेपदावर असतांना तीन बायका निवर्तल्यावर त्यानें तीन स्त्रिया वंशवेल वाढण्याच्या इच्छेनें केल्या. वंशाचा दिवा असणें ही त्या काळची रूढी मानली तरी बाजीरावाच्या विषयसेवनाची तीव्रता त्यामुळें खास लपत नाहीं. पेशवे दप्तराच्या ३२ व्या खंडात पत्र नंबर २३ (२२-२-१८०३) च्या पत्रांत, जनार्दन नारायण नांवाचा एक कारकून बाजीरावासाठीं मुली शोधण्यासाठीं कोकणांत गेल्याचा उल्लेख आहे. त्या पत्रांत तो कारकून म्हणतो: 'राजश्री विनायक भट खरे यांची कन्या वर्ष ६ सरून सात वर्ष आषाढमासीं लागली. ती मूल चांगल्यात दृष्टीस पडली. आणखी दोन मुली—सोमण व यक सहस्त्रबुद्धे यांच्या नववर्षाच्या मध्यमप्रतीत आहेत. त्या तूर्त आणीत नाहीं. भेटीनंतर त्यांचें स्वरूप वर्णन करीन' १८०३ रोजीं बाजीराव होता अठ्ठावीस वर्षाचा अन् त्याच्यासाठीं त्याचा कारकून मुली पहात होता, सात नि नऊ वर्षाच्या. पण त्यावेळीं मुलींच्या लग्नाची कमाल वयोमर्यादा असे नऊ. नवरा नवरीच्या वयांतले अंतर, वर बिजवर असला कीं, अतिशय विषम असे, अर्थातच नवऱ्याच्या अति विषयसेवनामुळें स्त्रिया अकालीं मरत. बाजीरावाच्या पहिल्या तीन लग्नाच्या बाबतींतला हाच प्रकार दिसतो. असो. पुढील पांच लग्नें त्यानें ब्रिठूरास केलीं. त्याच्या आठव्या स्त्रीला दोन मुली झाल्या. त्यांतली कुसुमबाई-उर्फ बयाबाई-उर्फ सरस्वतीबाई आपटे (ज. १६-१-१८४७) दीर्घकाळ हयात होत्या. तात्यासाहेब केळकरांच्या तोतयाच्या बंडाचा नाटकाचा प्रयोग १९१३ सालीं पुण्याच्या किर्लोस्कर थिएटरांत पहाण्यास त्या उपस्थित होत्या. एवढीं लग्नें करूनहि बाजीरावाला मुलगा न झाल्यानें अखेरीस मुलगे दत्तक घ्यावे लागले. त्यांतलाच एक धोंडोपंत उर्फ नानासाहेब पेशवे १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धांत नांवारुपाला आला. बाजीरावाच्या संसाराची शोकान्तिका अशी आहे.

रावबाजीचें ब्रह्मावर्तांचें आयुष्य गंमतीदारपणें चाललें होतें. आपल्या आजोबानें—थोरल्या बाजीरावानें काय केलें अन् आपण काय केले याची क्षिती त्याला नव्हती. या उभयतांचे स्मरण झालें कीं, केशवसुतांच्या पुढील काव्यपंक्ती मनांत उभ्या रहातात:

'त्या शूराने भगवा झेंडा हिंदुस्थानीं नाचविला
निजराष्ट्राचें वैभव नेलें एक सारखें वढतीला
आणि तुवां रे ?—त्वां नीचाने पाठ आपुली दावुनियां
रणांतुनी पौबारा केला, शेपुट भ्याडा वळवुनियां'

रावबाजीच्या मृत्युपूर्वी एक वर्ष आधीं (१८५०) सरदार रघुनाथराव विंचूरकर ब्रह्मावर्तास गेले होते. त्यासंबंधीं आपल्या तीर्थयात्रा प्रबंध ग्रंथात त्यांनीं पुढील हकिकत सांगितलेली आढळते. प्रथम भेटींत बाजीराव त्यांना म्हणाला, "आम्हीं येथें आल्यापासून आमचे सरदारांपैकीं रघुनाथराव तुम्हींच येऊन भेटलां. येणें करून संतोष वाटतो" पुन्हां ते निरोप घेण्यास निघालें तेव्हां बाजीराव त्यांना म्हणाला, "आम्हांसही काशीयात्रेस जाणें आहे. तुम्ही आमचे बरोबर चलावें". रघुनाथरावांनीं आपल्या वडिलांच्या अस्थि प्रयागला टाकायच्या आहेत असें म्हटलें. त्या सुमारास त्यांची पत्नीहि निवर्तलेली होती. तें स्मरून "बरें तर. लौकर यात्रा करून परत यावें. याच मुक्कामी तुमचें लग्न कर्तव्य आहे" असें म्हणून त्यानें त्यांना भोजनास बोलावून—पोशाख वगैरे देऊन सन्मानानें निरोप दिला.

उत्तारवयांत बाजीरावाची प्रकृती फार थकत गेली. त्याला अर्धांगवायुहि झाला. अन् मग इंग्रजांना स्वराज्याचे दान करणारा रावबाजी ब्रह्मावर्तास १४ जानेवारी १८५१ रोजीं मृत्यु पावला. सरदार विंचुरकर त्या समयीं तिथें उपस्थित होते. त्यावेळचें वर्णन त्यांनी 'तीर्थयात्रा प्रबंधांत' पुढील प्रमाणें केलें आहे: 'या प्रसंगीं प्रत्येकास फार दुःख झाले ! शेंकडों ब्राह्मणांचीं कुटुंबें अन्नदाता गेला असें पाहून तोडांत माती घालूं लागली ! गांवांतील संपूर्ण लोक दुकानांतील सर्व व्यापार बंद करून तेथें जमले. एकंदर पंधरा हजारांवर मनुष्यें त्यांच्या समीप ते समयीं एकसारखा शोक करीत होती ! नंतर नानासाहेब यांनीं त्यांस अग्निसहवर्तमान भागिरथीतीरीं नेऊन त्यांचा उत्तरविधी जसा कर्तव्य तसा केला' बाजीरावाच्या निधनाचें विंचूरकरांचें वरील वर्णन हृदयस्पर्शी असलें तरी त्याच्या मृत्युसमयीं थोरल्या बाजीरावांचें स्मरण होऊन केशवसुतांच्या पुढील काव्यपंक्तीच आठवतात:

'निजनामाचा 'गाजी' ऐसा अर्थ उरवुनी तो गेला
तर हळहळली आर्यमाउली ऐकुनि त्याच्या निश्वनाला !
मरणा आधिच मरुन आणुनि काळोखी निज राष्ट्राला
तूं मेलासी करून 'पाजी' अहह पितामह-नामाला'

बाजीरावाच्या मृत्युनंतर सहा वर्षांनीं १८५७ चें स्वातंत्र्ययुद्ध झालें अन् त्यांत समग्र पेशवेकुळ नष्ट पावलें. त्यांतील वीर नानासाहेब पेशवे केव्हां मेला याचा पत्ता आजतागायत लागलेला नाहीं. रावबाजीची कन्या बयाबाई आपटे वाराणशीस दि. १९–६–१९१७ रोजीं मृत्यु पावल्या. त्यांचें सौभाग्यलेण्यांसहचे छायाचित्र 'सह्याद्रि' मासिकांत (१९४२) पहावयास सांपडते तर त्यांचे 'सोवळ्या' झाल्यावरचें चित्र पारसनिसांच्या इतिहास संग्रह मासिकांत आढळतें. त्यावरून त्या चांगल्या सुस्वरूप असाव्यात असें दिसतें. दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या कुटुंबासंबंधींची माहिती इतिहासाचार्य राजवाडयांनी ११–२–१९१३ च्या 'केसरी'त दिली आहे ती वाचण्यासारखी आहे. बयाबाई आपटे १९१७ सालीं निवर्तल्यावर संदेशकार अच्युत बळवंत कोल्हटकरांनीं 'संदेश' पत्रांत 'शेवटची वेल सुकली' हा मृत्युलेख लिहिला आहे तो कोण्याच्याहि डोळ्यास पाणी आणील असा आहे. त्यावेळीं त्यांनी म्हटलें: 'मराठी राज्याचा इतिहास प्रतापवंत शिवाजी महाराजांपासून सुरू झाला व प्रतापहीन बाजीरावाशीं संपला. मराठी इतिहासाचें पहिलें कव्हर शिवाजी आहे व शेवटचें मलपृष्ठ बाजीराव आहे.'

आमच्या सगळया संशोधकांनी शेवटच्या बाजीरावाचा चांगला समाचार घेतला आहे. सगळयांच्या रोषास तो पात्र ठरला आहे. पण अपवाद असावयाचा. त्यालाहि एक भक्त भेटलाच अन् ते म्हणजे आमचे महाराष्ट्र सारस्वतकार वि. ल. भावे. त्यांनी आपल्या 'मराठी दफ्तर'च्या दुसऱ्या रुमालाच्या (१९२२) प्रस्तावनेंत रावबाजीवर स्तुती-सुमनें उधळली आहेत. अर्थात त्यांची ही रावबाजी स्तुती रियासतकार सरदेसायांनाहि मान्य झाली नाहीं अन् त्याबद्दलचा निषेध त्यांनी आपल्या 'संसारयात्रे'त नमूद केलेला आहे.

मराठी राज्य गेल्याबद्दल-घालविल्याबद्दल अनेकांनीं बाजीरावाला दोष दिला आहे. पण त्याला त्याचें कांहींच वाटत नाहीं. तो काय म्हणतो पहा, "ईश्वरानें राज्य घालविण्यास मला उत्पन्न केलें. माझा काय इलाज आहे. राज्य गेलें यांत लोकांचें मी काय नुकसान केलें ?" बाजीराव कतृत्वशून्य ही गोष्ट तर खरीच पण राज्यनाशास तो एकटाच जबाबदार होता काय हा प्रश्नहि विचार करण्यासारखा आहे. यासंबंधीं इतिहासाचार्य वि. का. राजवाडयांनी व्यक्त केलेला पुढील अभिप्राय (ऐतिहासिक प्रस्तावना, खंड ३ रा, पृ. १८४, १९२८) देऊन हा लेख संपवितो.

'१७९६ पासून १८१८ पर्यंत बाजीरावाच्या कारकीर्दीत दंगेधोपे, परस्पर मत्सर, देशद्रोह, यादवी, भ्रष्टाचार वगैरे सर्व कांहीं प्रकार होऊन, शेवटीं भरतखंडांतील सत्ता नष्ट होण्याची वेळ आली. दुष्ट, भ्रष्ट, भेकड, अविश्वासी, कतृत्वशून्य असा जो बाजीराव त्याचा जर द्वेष सर्व सरदारांना झाला होता तर त्याला काढून किंवा, दाबांत ठेवून मराठ्यांची संयुक्त सत्ता राहिली नसती असें नाहीं. शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले, पटवर्धन वगैरे सरदारांची इभ्रत संयुक्तसत्ता तोलून धरण्या इतकी नव्हती अशी कांहीं गोष्टी नव्हती. महाराष्ट्रांतील शिलेदार, सुखवस्तु लोक, साधू, संत, भिक्षुक, शास्त्री कोठें पळून गेले होते अशांतलाहि प्रकार नव्हता; परंतु परस्पर विश्वास, देशाभिमान वगैरे जे राष्ट्रीय नितीमत्तेचे मुख्य घटक त्यांची सर्वत्र वाण पडल्यामुळें ह्या सरदार, शिलेदार व मुत्सद्दी मंडळीनीं बाजीराव ब्रह्मावर्तास गेलेला सुखानें पाहिला.

[ संपूर्ण ]



अनुक्रमणिका






# श्रद्धा



डॉ. मनोहर गोविंद पंडित

***शास्त्राला असा अहंकार वाटतो कीं, मला साऱ्या प्रश्नांची उत्तरं ठाऊक आहेत, तीं सहज देतां येतात. पण कधीं कधीं शास्त्राचा हा अहंकार गळून पडतो आणि त्यालाही "श्रद्धा" जिंकून टाकते.***

**जगांत** देव आहे? नीति आहे? धर्म आहे? श्रद्धा आहे? श्रद्धेय असं कांहीं आहे? प्रेम वगैरे शब्द आपण वापरतो ते आहेत? ह्या साऱ्यांच्या अस्तित्वांतून निर्माण होणारा–घडणारा आशावादी माणूस आहे? कधीं कधीं असल्या प्रश्नांनीं मी अस्वस्थ होतो. शास्त्राचा मी विद्यार्थी. शास्त्राचा मी अभ्यासक! साऱ्या प्रश्नांना शास्त्रांत उत्तरं आहेत अशीच माझी भावना लहानपणापासून वाढीला लागली होती. कारण जगांत देव असलाच तर तो माझ्या वांटयाला कधीं आलाच नाहीं. जगांत श्रद्धा असलीच तिला सतत तडे जावेत असेंच जीवन माझ्या वांटयाला सतत येत गेले. वयाच्या दहाव्या वर्षी माझे आई वडील वारले–देवीच्या सांथीनें त्यांचा बळी घेतला. त्यानंतर अवघ्या जगांत मी एकटाच उरलों. जगांतल्या व्यवहारांत मी नवखा होतो. प्रेम, सहानुभूति, माणुसकी, आपुलकीची नातीं ह्या संबंधींच्या व्यवहारांत फक्त 'सौदा' ओळखला जातो हें समजत नव्हते. हातीं पायीं धड होतो. उरांत उमेद होती. डोक्यांत निरनिराळीं प्रमेयें उकलून पाहण्याची कांक्षा होती. पण ह्या साऱ्या प्रयोगासाठीं पैसा हवा होता. म्हणून मी लौकिक लाज सोडली आणि वाटेल ते कष्ट पत्करले. प्रेमाच्या शब्दांत दडलेला 'सौदा' 'व्यवहार' मला मला लवकर कळूं लागला. पण मला तो मान्य करणेंच भाग होते.

कारण अवघ्या जगांत माझा मीच होतो. जीवनाचा 'व्यवहार' साधण्यासाठीं मला हा 'सौदा' साधणें भाग होते.

मी तो साधीत गेलो. पण तो साधतांना तर्क कठोर बनत गेलो अश्रद्ध बनत गेलो. प्रत्येकाची 'शास्त्रीय' चिकित्सा करीत गेलो. डोक्यांत तर्क आणि श्रद्धेची अनेक द्वंद्वें वागवीत गेलो. 'चमत्कार' भावडे

वाटूं लागले. चांगले पारखून घेतांनाही मी वारंवार ठेंचकाळूं लागलो. वाईटाला वाईट म्हणतांना कांहीं अन्याय तर होत नाहीं ना ह्याविषयीं मनांत साशंक होऊं लागलों. श्रद्धेचे मानसशास्त्र मला फसवे वाटूं लागलें.

मी शिकत होतो. शिक्षणानें प्रश्नांचीं उत्तरें सांपडतात असें मानलें जातें. कांहीं मला सांपडतही होती. पण डोक्यांत गोंधळच जास्त उडत होता. मी शास्त्राच्या जवळ जात होता. प्रमेयें सोडवीत होतो. पदव्या मिळवीत होतो. ज्ञानी म्हणवला जात होतो आणि तरीही माझ्या श्रद्धांना वारंवार तडे बसत होते. हे तडे झेलीत झेलीत मी एम्. एस्.सी झालों. शाळेंत मला नोकरी होती. शाळेनेंच मला खरी मदत केली होती. तिनेंच मला प्रगतीची दिशा दाखवली होती.

शाळेच्याच आशिर्वादानें मला एम्. एस्.सींत चांगलें यश मिळालें. पण मला समाधान नव्हतें. नवीन नवीन क्षेत्र हवें होतें. संशोधनाला वाव हवा होता. शास्त्राची चिकित्सा करतां येईल असें कार्यक्षेत्र हवें होतें आणि म्हणून मी कॉलेजें शोधूं लागलो. ओळखी नव्हत्या, वशिले नव्हते. त्यामुळें अर्ज पाठविण्याचा निष्काम कर्मयोग मी करीत राहिलो होतो.

पण—

मला माझ्या बुद्धिनिष्ठ चिकित्सेला पहिला तडा गेला रत्नापूर. कॉलेजचे पत्र आले तेव्हां! वशिला नसतांना मला त्यांनीं बोलावलें होतें.

मी गेलो. इंटरव्ह्यू चांगला झाला. आणखी कांहीं लोक आले होते.

माझी निवड झाली. मला एक नवें दर्शन घडलें. एक नवी श्रद्धा माझ्या मनाला कुठेंतरी हलवून गेली.

मी नौकरीवर लगेच रुजूं झालो.

आवडीचा विषय, शिकवायची हौस आणि समोर बसलेले बुद्धिवान चेहरे पाहून मी हरखून गेलो. आणि ह्याचं प्रत्यंतर म्हणजे, "इतक्या थोड्या अवधींत इतका लोकप्रिय प्राध्यापक ह्या कॉलेजला मिळाला नव्हता" असे स्वतः प्रिन्सिपॉल साहेबांचे शब्दहि माझ्या कानावर पडले. खरोखरच श्रद्धा ठेवण्यासारखं कांहीं आहे असं वाटूं पहात होतं, आणि अशाच विचारांत पहिलं वर्षं संपलं होतं. इंटरच्या मुलांना थोडं जास्त शिकविण्याची जरूर वाटल्यामुळें मी उन्हाळ्याच्या सुट्टींत सकाळीं जादा वर्ग घ्यायचं कबूल केलं होतं. नाहींतरी सुट्टींत जायचं कुठं हा प्रश्न होताच! जीवाभावाचं असं मला कुणी नव्हतंच. वसतीगृहामधल्या रेक्टरच्या घरांत माझी रहायची सोय झाली होती. वऱ्हाडी उन्हाळा आपले अस्सल खायचे दांत दाखवायला लागला होता. टेकडीवर असल्यामुळें रत्नापूर गांव इतर गांवापेक्षां निश्चितच थंड होतं. खास उन्हाळा खाल्लेला माझा देह त्या मंद उन्हाळ्यांत सुखावत होता. नाहीं म्हणायला पाण्याचं दुर्भिक्ष मात्र गांवांत फारच होतं. आमचं कॉलेज उंचावर असल्यामुळें तेथें तर विशेषच जाणवायचं. आमच्या वसतीगृहाची विहीर तर केव्हाच आटली होती. कोंडबा—कॉलेजचा चपराशी कुठूनतरी जवळून पाणी घेऊन यायचा, तेव्हां कुठें आंघोळ करायला मिळायची. "कारे, कुठून पाणी आणतोस? इकडे तर सगळीकडे ठणाणा दिसतोय" मी त्याला एकदा विचारलं!

"ध्यो काय तिकेडे" आमच्या लहानशा टेकाडाच्या पायथ्याकडे बोट दाखवत त्यानं सांगितलं. "ध्यो संकट मोचनाच देऊळ दिसत नव्ह कां? तिकूनच आनलजी म्या पानी; किती बी गरमी झाली तरी त्या हनुमानाची इहिर सदा भरलेली. अवो, रहाट नाय ना, दोर नाय, आपलं हातात बालटी घेऊनशान जर अंदर वाकलं का, हे बालटीभर पानी. आन ग्वाड तरी किती हाय मास्तर! कसबी झाल तरी साध्वीच पानी हायं! हावं" ह्या त्याच्या माहितीनें मला कांहींच उलगडा झाला नाहीं. "अरे हनुमानाचं कसलं आलय, पायथ्याशी आहे ती विहीर, आलं असेल उतरंडीचं पाणी दुसरं काय?" मी म्हणालो. जमिनीखालच्या प्रवाहाबद्दल मला माहिती होती. तेव्हा कोंडबाच्या चमत्कारांत मला शास्त्राचं प्राथमिक तत्व दिसलं तर आश्चर्य नव्हतं.

संध्याकाळी कंटाळा आला म्हणून बाहेर उभा होतो. पाण्याच्या अभावी कॉलेजची बाग पार सुकली होती. ६–६॥ चा सुमार असूनही उन अजून चकचकीत होतं. गरम वारे पण शरीराची काहिली वाढवत होते. तेवढ्यांत माझे दोन विद्यार्थी मला रस्त्यावरून जाताना दिसले. मला पाहतांच नमस्कार करून एकजण म्हणाला.

"सर आज भारीच उकडतय नाहीं? आता पहिला पाऊस येईपर्यंत हे असंच चालणार. हे शेवटचे ८–१० दिवस भारीच त्रासदायक असतात. आमच्या रत्नापूरला, चलतां का फिरायला? पलिकडे मारोतीच्या देवळाशेजारीच फक्त जरा हिरवळ असते ह्या दिवसांत!"

सकाळचे कोंडबाचे शब्द मला आठवले. उद्योग कांहींच नव्हता. तेव्हां म्हटलं,

"चला! बघूं या तुमच्या गांवचा संकटमोचन; मला जरा आधी भेटला असता तर बरं झालं असतं!"

माझ्या ह्या वाक्याचा अर्थबोध त्यांना होणं शक्यच नव्हतं. मी थोड्या दिवसांपूर्वीपर्यंत काढलेले कष्ट, सोसलेली मानहानि आणि आपल्या दैवाला दिलेला दोष त्यांना कुठला ठाऊक असायला?

आम्हीं टेकडी उतरून खाली आलो. खरोखर वरच्या बाजूच्या रखरखीत




अनुक्रमणिका

भागांत हाच एवढाच हिरवा भाग पाहून मनाला फार बरं वाटलं होतं, गांवातले बरेचसे लोक थोड्याश्या थंड हवेच्या हव्यासानें तेथें आले होते. माझे कांहीं विद्यार्थी पण त्यांत होते. त्या सर्वांच्या सुखस्वस्तूपणाचं तेज त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होतं आणि त्यांच्या वयाचा असतांना उपसलेल्या कष्टांच्या आठवणीनें मी उगीचच थोडा बैचेन झालो.

देवळाचं तोंड दक्षिणेकडे होतं. आणि तेथें एक दगडी दीपमाळ केलेली होती. तिच्याभोंवतीं ह्याहि दिवसांत कांहीं रानटी रोपटीं आपली इवलीशी फुलं मिरवीत होती. त्यांच्याकडे पाहून मला उगीचच जरा आपलेपणा वाटला. मी तेथेंच जागा पाहून माझ्या तरुण मित्रां-बरोबर बसलो. बाजूला एक वयोवृद्ध गृहस्थ बसले होते. देवदर्शन घेऊन थोडा वेळ निमित्त मात्र टेकणाऱ्यापैकीं ते नसावेत. चेहरा, आयुष्यांत सर्व कांहीं मिळाल्याच्या समाधानं फुललेला दिसत होता. साठीच्या बरंच पुढें वय असावं पण तब्बेत चांगली सांभाळून ठेवलेली होती. उकाड्याच्या त्रासामुळें दिसणाऱ्या बारीक अढीचा संपूर्ण अभाव त्या चेहऱ्या-वर होता. उन्हाळा आहे तेव्हां हें असं चालायचंच, त्यांत इतकं रम्य शांत स्थळ आहे हेंच विशेष असा भाव त्यांच्या चेहऱ्यावर होता. भोंवतालच्या सर्वच गोष्टींचं ते मोठ्या सहृदयतेनें रसग्रहण करत असावेत. जवळच 'प्रसाद'चा एक अंक होता. मधून मधून त्यांतली पानें चाळीत ते आपला वेळ मजेंत घालवत होते.

"सर, गांवातल्या सगळ्या विहीरी आटल्या आहेत. पण सतीची विहीर मात्र तुडुंब भरली आहे. काय कारण असेल ह्याचं ?" एका जिज्ञासू विद्यार्थ्यानें मला विचारलं.

"त्याचं असं आहे." मी सुरुवात कर-णार तोच ते वृद्ध गृहस्थ म्हणाले.

"मी सांगूं तुम्हांला ? अर्थात ही आपली आमच्या पिढीच्या श्रद्धेची व विश्वासाची गोष्ट आहे. तुम्हांला कांहीं पटणार नाहीं. पण असं झालं होतं एवढं मात्र खरं."

"सांगा न आम्हांला." माझी आणि विद्यार्थ्यांची ओळख करून देऊन मी म्हटलं. खूप ऐकलंय् मी ह्या "संकट-मोचन देव" आणि "सतीची विहीर" यांच्याबद्दल. पण सगळी हकीकत ऐका-यला मिळाली नाहीं अजून."

"फार वर्षापूर्वींची गोष्ट आहे." ते वृद्ध गृहस्थ सांगू लागले. "मी नुकतीच फायनल परीक्षा पास झालो होतो. त्या जमान्यांत एवढं शिक्षण पुष्कळ असे. आणि शिवाय माझे वडिल नोकरींत होतेच सरकारच्या, तेव्हां मला लागलीच सब मुनसफाची नोकरी लागली. त्यावेळीं हे देवस्थान मारुळकर पाटलांच्याच मालकीचं होतं. जमीनींच्या झगड्यांत मी कित्येक वेळां येथें येऊन पहाणी केली होती. गांवापासून बरीच लांब, अगदीं एका बाजूला म्हणून ही जागा पडीतच होती. पण मग कृष्णम्भटजींना संसाराचा वीट आला. पत्नी आधींच निवर्तली होती. मुलगाही आतां मोठा झाला होता. नोकरदार होता तेव्हां त्यांनीं गृहस्थाश्रमाचा त्याग केला ते ठीकच होतं. येथें आले आणि हा बाजूला पडलेला एक मारुति—कसला—एक थोडा-फार शेंदूर फासलेला मोठा थोरला दगड होता तेव्हां—पण त्यांनीं सांग्रसंगीत मांडला त्याला इथं. दिवसभर खपून एक लहानसं तट्ट्याचं खोपट उभारलं. बाजूला ही लहानशी विहीर होती, पण उन्हाळ्यांत तीहि कोरडी ठणठणीत व्हायची. दोन अडीच मैलावरून म्हातारा पाणी आणायचा. आणि त्याला एकट्याला अन् त्याच्या देवाला पाणी असं लागणार तरी किती ? त्याच्या एकुलत्या एका लेकाच्या आजारांत म्हणे त्याला हा पावला होता. आणि म्हणूनच त्याने त्याच्या देवाचं नांव ठेवलं होतं "संकट विमोचन."

सहज जरा लांब फिरायला म्हणून गांवातले गुलहौशी लोक यायचे आणि घटका दोन घटका बाजूला बसायचे. आम्हीही त्यांतलेच एक होतो.

दिवस जात होते. संकटं येत होतीं. कांहींची त्यांतून सुटका होत होती. याचं श्रेय कांहीं भाविक या देवाला देत होते. अशाच लोकांनीं हळुंहळू हे देवस्थान वाढवलं. आणि कळत नकळत देवळाचा आणि देवाचाही कायकल्प झाला ! देऊळ नीट बांधण्यांत आलं. कोठल्याशा मारवाड्यानें सभामंडप बांधला. विहीर आणखी खणून पाणी वाढविण्याचे प्रयत्नही झाले पण तेवढे मात्र भरपूर पैसा आणि श्रम खर्चूनही यशस्वी झाले नाहींत. उन्हाळ्यातले पाण्याचं दुर्भिक्ष्य तसंच होतं. हातगाडी-वर घालून पाणी आणावं लागे. भक्त-

प्रकाशबंदीसाठीं नव्हे-सोमवार म्हणून बंद

अनुक्रमणिका

मंडळी त्या काळीं तेही करीत होती आणि नाहींतर कृष्णमभटजी होतेच !

पुढें वय झालंम्हणून वा आतां पुरे झालं म्हणून, पण एक दिवस कृष्णम्भटजींनीं आपली इथली वस्ती उठवली. आतां देवस्थान चांगलं वाढल होतं. उत्पन्न भरपूर तेव्हां त्यांच्या मुलाला "वामनशास्त्रींना" त्याचा लोभ सुटला. नोकरीची दगदग न करतां इथें आरामांत बसून देवस्थानच्या उत्पन्नावर मजेंत रहावं हें कळण्याइतपत हुशार तो नक्कीच होता. देवावरची "श्रद्धा" ही चीज त्याच्याजवळ मुळीचं नव्हती—पण बापाच्या पुण्याईमुळें देवस्थानच्या व्यवस्थापक मंडळींनीं अगदीं मारुळकर सावकारांसुद्धां सर्वांनीं—मोठ्या आनंदानें देवस्थानचा कारभार त्याच्या हातीं दिला. पण वामनभट इथें आला तो वेगळ्याच कल्पना घेऊन. आपल्यासाठीं लागलीच त्यानें चार गाळे बाढून घेतले—अर्थांत लोकांच्या पैशावरच. पूजाअर्चा आपल्या पत्नी, सावित्रीवर सोंपवून स्वतः आरामी, जीवन घालवायला त्यानं सुरुवात केली. सासऱ्याच्या भाविकपणाच्या संस्कारांत वाढलेली ती साध्वी मनापासून देवाचं सगळं करी. तिचा नवरा मात्र दिवसेंदिवस वहावतच चालला. हां हां म्हणतां त्याला वाईट संवय लागली आणि सामान्यांनींही टाळावेत असले शौक तो भट देवस्थानच्या आवारांत करूं लागला. त्यांत मारुळकर सावकाराचा वांया गेलेला लेक त्याचा दोस्त बनला आणि बघतां बघतां ते दोघं वाया अन् बाटलीचे भक्त बनले.

गांवांत आणि पंचक्रोशींत यावर चर्चा होऊं लागली, वादळं होऊं लागली. मारुळकर सावकार वृद्ध असला तरी मनाचा सच्चा होता. त्याने दोन चार वेळां वामनभटाला समज दिली दम दिला. पण रामा शिवा गोविंदा. तो कोणाचंच ऐकेना.

शेवटीं देवस्थानच्या ट्रस्टी मंडळींनीं त्याला तेथून काढायचं ठरवलं. बिचाऱ्या सावित्रीनें पित्याच्या मायेनें सावकराचे पाय धरले पण इच्छा असूनही, त्याचा इलाज नव्हता. कारण वामनशास्त्र्याच्या चाळचापुढें तो तरी काय करणार ? दोनचार दिवसांत त्याची उचलबांगडी व्हायची होती. मारुळकराच्या बहकलेल्या लेकानं वामनरावाला सांगितल "सावित्रीला माझ्याकडे पाठव, मी तुला यांतून वांचवतो" नाहींतरी वृद्ध मारुळकर आतां थकले होते. त्यांचा सर्व कारभार त्याच्याच हातीं येणार होता. वामनरावाला हें पटलं आणि अवनतीला गेलेला तो त्यालाही तयार झाला.

त्यानं जंग जंग पछाडलं पण सावित्री दाद देईना. साध्वी ती. तिनं जीव द्यायचीही धमकी दिली. पण विनाशकाले....त्यायानं तिच्या नवऱ्याला त्याचं कांहीं वाटलं नाहीं.

दुसऱ्याच दिवशीं रात्रीची गोष्ट. त्यानं सावित्रीला बजावलं "आज रात्रीं मीच तुला छोट्या सावकाराकडे नेणार. हें झालंच पाहिजे. एवढं मोठं उत्पन्न बंद झालं तर तूं, मी आणि तुझ्या मुलानं काय उपाशी मरायचं ?" ती त्याच्या हातापायां पडली. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. रात्रीची झांकपाक संपवून मागच्या अंगणांत गेली अणि तेथून दोन अडीच मैलाच जंगल तुडवून—तेव्हां हें सर्व जंगलच होतं— ती गांवांतल्या पहिल्याच घरांत गेली. आपटोंच्या काकूला गाठलंन्. आपल्या पोराची वेळ प्रसंग आला तर काळजी घ्यायचं त्यांच्याकडून कबूल करवून, त्याच पावलीं परत आली. स्नान केलं घरच्या देवीची पूजा केली हळदकुंकूं वाहिलं, स्वतःला मळवट भरलान् आणि मारुतीपाशीं गेली. म्हणाली, "आजवर सगळ्यांची संकटं निवारण केलीस, न तुला संकटविमोचन नांव देणाऱ्या आणि मनोभावानं तुझी सेवा करणाऱ्या माझ्या मामंजीच्या सुनेची तुला दया येईना. माझं दुःख तुला बघवलं कसं ? तुझ्याच विहीरींत मी आतां जीव देणार—पण माझ्यासाठीं जीव द्यायला सुद्धां तिच्यांत पाणी नाहीं."

ऐन उन्हाळ्याचे दिवस होते. विहीर केव्हांचीच कोरडी झाली होती. पण त्या साध्वीनं आंत डुंकून पाहिलं नाहीं. अंग झोंकून दिलं. दुसऱ्या दिवशीं पहांटेची गोष्ट. आपटे काकूनं हांक टाकली आणि ही माणसं गोळा झाली. त्या वेळीं रत्नापूर होतं केवढं ? फाटकांत उभा राहून हांक टाकली तर दाराशीं गांव गोळा होई आपटेकाकूनीं रातची हकीगत सांगितली आणि सगळे निघाले वामनशास्त्र्याच्या घराकडे.

सारं घर उघडंच होत. वामनभटाचा पत्ताच नव्हता. धाकटा नारायण-सावित्रीचा लेक—नुकताच जागा होऊन आईसाठीं रडत होता. शोधाशोध करीत मंडळी विहीरीपाशीं आली. कोणीतरी डोकावून पाहिलं तर काय ? सती सावित्रीचं कलेवर विहीरीच्या तोंडाशीं तरंगत होतं. आणि विहीर पाण्यानं तुडुंब भरली होती. लोकांनीं सावित्रीला काढली आणि तेव्हांपासून ही विहीर आजतागायत आटलेली नाहीं. विहीरीचं नांव पडल "सतीची विहीर" आणि देवळाचं अन देवाचं नांव कायम झालं "संकटविमोचन."

> [ ज्ञानेशही कबूल करतील ]
> **पु. ल. दे. च्या पाठीं ।**
> **जो कोटी करील मऱ्हाठी ।**
> **तेणें वियानीच्या प्लेटीं ।**
> **जाण डाळ-वाटी ठेविली ॥**

आतां तुमची नवी पिढी आली आहे. शास्त्राचं कॉलेजपण सुरू केलंयं तुम्हीं इथें. तुमच्यापैकीं कोणीतरी शोध लावेल – कीं, जमिनीच्या खालून एक पाण्याचा प्रवाह येतोय, आणि उतारामुळें त्याचं तोंड उघडलंय तें नेमकं या विहीरींत ! पण मग आधीं तो प्रवाह कुठें होता ? आणि त्याचा आ वासायला, आमची सावित्री कां जावी लागली ?" उपरण्यानं चष्म्याच्या कांचा साफ करीत ते गृहस्थ म्हणाले "आमच्या पिढीची आपली 'श्रद्धा' आहे. देव कधीं दोहीं हातांनीं मारत नाहीं."

मी आणि माझे विद्यार्थी उठलो. त्या गृहस्थांना नमस्कार करून आमच्या वसतिगृहाच्या वाटेला लागलो.

"सर तुमचा विश्वास आहे अशा गोष्टींवर तुम्हीं विज्ञानाचे प्राध्यापक म्हणून विचारतोय !" एकजण म्हणाला.

काय उत्तर द्यावं अशा विचारांत मी मागे वळून पाहिलं. आमच्या कॉलेज इमारतीच्या बांधाकामावरील एक माल मोटर वाजून गेल्यामुळें उडालेल्या धुरळ्यांत ते देऊळ, ती विहीर आणि सद्‌गृहस्थ सगळे अदृश्य झाले होते—पण क्षणभरच. थोड्याच वेळांत सर्व धूळ नाहींशी झाली—आणि ते सर्व मला परत स्पष्ट दिसायला लागलं. मावळत्या सूर्याच्या किरणांत देवळाचा कळस आणखीनच सुस्पष्ट दिसत होता.

माझ्या मित्रांकडे वळून मी म्हटल "हो ! मधें मधें अस्पष्ट झाल्यासारखी वाटली तरी "श्रद्धा" ही असतेच आणि ती असावीही !

● ● ●

अनुक्रमणिका









लेखक–चार्लस् शॉ

अनुवादक–प्र. श्री. नेरुरकर

## पूर्व कथासूत्र

**ॲलिसननें केलेल्या स्पर्शानें जणुं अंगावर फुलला. सिस्टर अंजेलाला ताप भरला. तिची शुद्ध गेली. ॲलिसनने मग तिची सेवा शुश्रुषा केली–जणुं आपल्या मुलीसारखी ! जिला वांचविण्यासाठीं तो पावसांतून, चिखलांतून, रात्रीतून खांद्यावर टाकून तो त्या बेटावर हिंडला. ताप हटला. पण ती अस्थिपंजर झाली. पण त्या आजारानें मात्र दोघांना एक वेगळें, नवें असे एकमेकांचें 'दर्शन' घडविलें – शरीराच्या चौकटीपलिकडचे, उदात्त !!**

# [१५]

## जपानी जहाजे आणि अमेरिकन विमाने

**नजीक** येणाऱ्या रात्रीच्या पहिल्याच थंडगार स्पर्शाने ॲलिसन जागा झाला. त्याला कांहींशी ताकद आल्यासारखी वाटली. तो उभा राहिला आणि त्याने आळोखे पिळोखे दिले. मग विचारलं, "कांहीं घडलं आहे कां ?"

"नाहीं," तिने उत्तर दिलं, "सगळं अगदीं शांत आहे."

"हुं." तिच्या उत्तराने त्याला अस्वस्थ केलं. "मला खात्रीनं वाटतं कीं, तें विमान मीं पाहिलं," तो म्हणाला, परन्तु त्याच्या वाणीत दुःखद शंका होती. "तें आमच्यापैकीं एक होतं–नक्की. मी पंखावरचा तारा पाहिला. आणि तोफा–त्या तोफा ! ती विमानेंच होती? त्या तोफाच होत्या ?"

त्यानें एक हात तिच्या खांद्यावर ठेवला आणि तिला हालवलं. तिच्याकडून जाणून घेण्यासाठीं.

क्षणांतच त्याच्या शंकेची व भीतीची तिला कल्पना आली.

"ओह्, होय, होय," ती त्याचं समाधान करण्याच्या स्वरांत म्हणाली, "तूं तें विमान पाहिलंस, आणि मी तें ऐकलं. तें अमेरिकन विमान आहे हे मला सांगण्यासाठीं तूं इथवर धावत आलास. मग तूं कोसळलास. थकलेला, अगोदरच भुकेलेला आणि त्यांतच विमाने पाहून तुझ्या मनाची झालेली खळवळ. तुझ्या वावतींत तें फारच अति झालं होतं. अगदीं तेव्हांपासून तूं अजून झोपूनच आहेस आणि आणखी विमाने कांहीं आलीं नाहींत. कांहीं घडलेलं नाहीं."

ॲलिसन विचार करीत होता. "आमचे लोक फार दूर नसावेत" तो म्हणाला. 'तुला कळत नाहीं कां? त्यांनीं तें एक विमान सभोंवार पाहणी करण्यासाठीं आकाशांत पाठविलं. त्याचा अर्थ तिकडे कुठेतरी सैनिक तळ आहे."

ॲलिसन इतका अस्वस्थ झाला होता कीं, त्या खड्डयांत रहाण्याची त्याला इच्छा होत नव्हती. बाहेर काय घडामोडी होत आहेत हे आपण शोधून काढलं पाहिजे असं त्याला वाटलं. आणि आपल्यासाठीं कांहीं अन्न मिळविण्याचा त्याला प्रयत्न केला पाहिजे हें त्याने ओळखलं. त्याच्याशिवाय तिथें रहाण्याचं सिस्टर अँजेलानें नाकारलं, म्हणून त्या रात्रीं शत्रूच्या तळाकडे जाण्यासाठीं त्यांनीं एकत्रच टेकडी उतरून खाली येण्याला सुरुवात केली. ती त्या जंगलाच्या टोकाला जाऊन पोचतात तोंच झाडांतून प्रकाश दिसायला प्रारंभ झाला. ती निरखून पहात असतांच प्रकाश विस्फारला आणि जळिताचा वास येऊ लागला. आश्चर्यानें ती निःशब्द बनली. ॲलिसन पुनः पुढारा झाला, आणि क्षणातच त्या तळाच्या टोकाला येऊन खाली दिसणारे दृश्य ती टक लावून पाहू लागली.

शत्रू शिबिरांत आगी पेटल्या होत्या आणि तिथें पुष्कळ आवक जावक होत होती. त्या उपसागरांत आणि त्या उध्वस्त तरीवर त्यांना जहाजांच्या छायामय आकृति दिसूं लागल्या. तिथे आरोळ्या उठत होत्या. यंत्राचा आवाज आणि सर्वत्र प्रकाश होता. ती निरखीत असतांच, त्या उध्वस्त स्थळाभोवती ज्वाळा उफाळून व धूम्रमय बनून तो धूर सर्व वस्तूंवर तरंगत होता.

"ते सगळं कांहीं जाळून टाकताहेत," सिस्टर अँजेला म्हणाली." "ते दूर निघून चालले."



अनुक्रमणिका






"होय. पण कां?" त्यानें विचारलं. आशा वाळगायला त्याला भीति वाटत होती. "आमचे लोक त्यांना माघारी ढकलून देत आहेत, असंही असेल. देवा, माणसाला कांहीं नुसतं कळूं शकलं तर."

नंतरच्या अवघ्या कांहीं तासांतच जपानी जहाजे उपसागर सोडून गेली. त्या तिथें खाली तळावर नीरवता होती आणि आगी मंद मंद जळत होत्या. ॲलिसनला खालीं जायचं होतं व सभोवार पहायचं होतं, परंतु पहाटेपर्यंत थांबलं पाहिजे हें त्याला ठाऊक होतं. सगळं सैन्य निघून गेलं हें जाणण्याचा कांहीं मार्ग नव्हता. त्या जंगलाच्या टोकाला त्यानें आणि त्या जोगिणीनें उरलेली रात्र घालविली, कांहीं झोपेंत, कांहीं आशादायक वडबडण्यांत.

दिवसा उजेडाच्या पहिल्या क्षणांतच ॲलिसननें अकस्मात् डोकं वर उचललं, ऐकत. "विमानें!" तो ओरडला. जोगीणीला त्यानें जागी केली आणि टेकडीवरील झुडुपांत मागे तिला खेचीत नेलं. पहिली विमानें त्यांच्या डोक्यावरून घरघरत गेली तसं त्याने तिला जमिनीवर लकटून दिलं आणि स्वत:ला तिच्या जवळ घालून घेतलं. असं करीत असतां बाँब गोळे पडणारी जमीन हालत आहे हें त्याला जाणवलं.

त्याने वीस विमानें मोजली, सगळी अमेरिकन, शत्रूच्या तळावर बाँब वर्षाव करणारी; जपान्यांनीं लावलेल्या आगीने उठणाऱ्या धुरामुळें तो तळ अजूनही छपून होता.

"तुम्हांला खूप उशीर झाला," ॲलिसन ओरडला. "खूपच! आहा दुर्दैव, गडयानो. काल कां नाहीं आलात तुम्ही?"

शेवटीं ती विमाने आग्नेय दिशेकडे निघून गेली. आणखी कांहीं ती येत नाहींत हें उघड झाल्यानंतर तो नौदल सैनिक आणि ती जोगीण खाली त्या जळणाऱ्या तळावर गेली. त्या मोडतोडीत, निराश होऊन, त्यांनीं अन्नाचा शोध केला, पण गोड द्रव असलेला एकच डबा काय तो त्यांना मिळाला. लहान मुलांप्रमाणें त्या गोड पदार्थांत त्यांनीं आपली बोटे खुपसली आणि आपली बोटे तोडांत सारूनच ती इकडे तिकडे फिरली.

"आपल्याला फार वेळ थांबावं लागणार नाहीं," ॲलिसन म्हणाला, "आमचे लोक आतां लवकरच इथे येतील."

सिस्टर ॲंजेलानें त्याच्याकडे पाहिलं. त्याचे केस वाढले होते. व त्यावरून फणी फिरली होती. त्याचे कपडे फाटले होते व चिखलाने माखले होते. त्याचं तोंड इतकं सडपातळ झालं होतं कीं, कातडी हाडांवर पसरलेली होती आणि त्याचे डोळे अनैसर्गिकपणें मोठे आणि लुकलुकणारे झाले होते.

त्यांच्या पहिल्या भेटीच्या वेळी तिने पाहिलेल्या त्याच्या चेहऱ्याची तिला एकदम आठवण झाली आणि त्या दोन चेहऱ्यांतून एक संपूर्ण आयुष्य निघून गेल्याचा तिला भास झाला.

तितक्यांत त्याने पाटलुणीचा पाय वर ओढला. आणि आपल्या उजव्या गुडघ्याची तपासणी केली. अगदीं गुडघ्याखाली एक अभद्र व्रण झाला होता.

"त्याबद्दल तूं मला कां नाहीं सांगितलंस?" रुग्णसेविकेच्या हुकुमी आवाजांत तिने विचारले "तो घाणेरडा दिसतो—धोका देणारा."

"तो निवळेल," तो म्हणाला, "माझ्या कारकीर्दीत आणि अन्यत्र आणखीही काही मला झाले आहेत. ते तसे राहू शकतात."

"नाहीं. ते तसे राहू शकणार नाहींत." ती आग्रहानें म्हणाली. तिनें त्याला खाली समुद्रावर जायला भाग पाडलं आणि अंग धुवायला लावलं. त्याच्या दृष्टिआड ती गेली आणि तिने आंघोळ केली. मग तिने आपला लिननचा उप-अंगरखा बाहेर काढला आणि वाळूने धुतला. तिने तो परत ॲलिसनजवळ नेला आणि त्याच्या व्रणाची परीक्षा करतां करतांच त्याच्या फाडून चिंध्या केल्या. मग समुद्रांत भिजविलेल्या त्या अंगरख्याच्या चिंध्यांनीं तिनें ते व्रण स्वच्छ धुतले.

त्या समुद्राचं आणि आकाशाचं त्यांनीं पांच दिवस निरीक्षण केलं परंतु अमेरिकन विमानें परत आलीं नाहींत. त्या जोगिणीनें लक्ष पुरवून व स्वच्छ धुवूनही ॲलिसनच्या व्रणांत सुधारणा झाली नाहीं आणि त्याच्या देहावर आणखी उठले. सिस्टर ॲंजेलाने त्याला समुद्रांत पडयला लावलं आणि त्या जखमा खाऱ्या पाण्याने धुवायला लावल्या; परन्तु त्याचा कांहीं फार उपयोग झाला नाहीं. त्याचं आजारीपण त्याच्या मनांत होतं; ते व्रण त्याची केवळ बाह्यचिन्हें होती.

त्याला हिरव्या पालेभाज्यांची जरुरी आहे असा तिने विचार केला, म्हणून त्यांनीं किनाऱ्याजवळील झुडुपांची पाने उकळली आणि खाल्ली. तो पदार्थ कडू होता आणि त्यांची पोटें त्यामुळें दुखू लागली. ॲलिसन अधिकच अशक्त झाला आणि त्याची आशा सुटू लागली. जंगलांत जाऊन पोटासाठीं शिकार करण्याइतका पुरेसा बळकट तो आतां राहिला नव्हता आणि मासे पकडण्याच्या बाबतीत दैवानें त्यांना दरिद्री साथ दिली. बाँबगोळ्यांनीं पाडलेल्या खड्ड्यांतील पावसाच्या पाण्यावर कृमिकीटकांचे आणि इवल्याशा इतर जीवाणूंच्या आकाराचे थर चढू लागले. ते पित होते ते पाणी उकळण्याइतकं शहाणपण सिस्टर ॲंजेलाजवळ होता पण अखेरीला त्यांच्याजवळील एकच एक पत्र्याच्या डबड्यावर छिद्रें दिसूं लागली. आणि शेवटीं त्याचे तुकडे तुकडे झाले. म्हणून पाण्याशिवाय ढकलतां येतील तितके दिवस गुजरण्याचा त्यांनी प्रयत्न केला. वेळोवेळी त्या ओढ्यापर्यंत त्यांनीं रात्री कष्टाची वाटचाल केली. आणि त्याचं पाणी पिऊन घेतलं.

सिस्टर ॲंजेलाला त्या नदीकांठाने रहायची इच्छा होती. प्रथम पोरकटपणानें ॲलिसननें विरोध केला; परंतु शेवटीं तो कबूल झाला.

ज्या दिवशीं तो एका झाडाजवळ पडून राहिला व त्याने हालचाल करायचं नाकारलं तेव्हां सिस्टर ॲंजेलाला निराशा वाटूं लागली. तोंड अर्धवट उघडलेलं, अशा त्याच्या करड्या चेहऱ्यावरील मंद डोळ्याकडे तिनें पाहिलं. पहिल्यांदा तिला शंका आणि आशाशून्य भीति वाटू लागली. शेवटीं परमेश्वर त्यांना





विसरून गेला होता का? या इथे नदीच्या चिखलांत निरुपयोगी-पणानें त्यांच्या दुःखाचा शेवट होणार होता काय ? या प्रश्नांचा तिने इतका धसका घेतला कीं, तिनें गुडघे टेकले. अजूनपर्यंत तिच्या गळ्यांत लटकणाऱ्या जपमाळेवरून तिने बोटे फिरवली आणि ती प्रार्थना करू लागली.

"मला सहाय्य कर!" ती त्या असहाय्य माणसाच्या जवळ त्या काळोखी जंगलांत गुडघ्यावर बसून ती ओरडली. "मला सहाय्य कर! मी काय करू तें मला सांग."

आणि तिला भास झाला कीं, स्वर्गांतील आवाज तिच्याशी बोलत होता व तिनें काय करावें तें तिला सांगत होता. ऐकतच ती क्षणभर गुडघे टेकून राहिली. मग ती उभी राहिली आणि ॲलिसनच्या बाहूला झोंबली.

"ये," ती पुटपुटली. 'चल ये. चल तिकडे दुसऱ्या किनाऱ्यावर जाऊ या. ते तिथे आपली वाट पहाताहेत."

"ठीक आहे," तो म्हणाला; त्याने तिची आज्ञा इतकी झटकन् मानली कीं, कुणीतरी आपणां दोघांना वाट दाखवीत आहे असं तिला वाटलं.

तिनें त्याला हळुहळु त्या जंगलांतून आणि त्या टेकडीवरून पश्चिम किनाऱ्याकडे नेलं. ॲलिसन, आपल्या आजारांत, अखंड अर्थशून्य बडबड करीत होता.

त्यांची प्रगति फार कष्टदायक आणि मंद चालली होती. त्याला पहिल्या कांहीं पावलानंतर, ॲलिसन जवळजवळ कोसळला पण तिने त्याला सांवरलं. जसजसे ते पुढे सरले, तसं त्याचं वजन तिच्यावर पडलं. आणि जवळ जवळ ती स्वतः कोसळली; परंतु ती उभी राहूं शकली व त्याला उभा ठेवूं शकली. आपल्या रस्त्यानें ती पुनः चालू लागली.

त्या बेटाच्या पश्चिम बाजूला त्याला नेलं पाहिजे ही एकच कल्पना तिच्या मनांत घट्ट रुजली होती आणि त्यानें ती कार्य-प्रवृत्त झाली होती. त्या किनाऱ्यावर त्याला तिला नेलंच पाहिजे होतं. जेव्हां फार पूर्वी त्याने शत्रू शिबिरांत घुसण्याचं धाडस केलं होतं व त्याला आपण हरवून बसलो असा तिला विश्वास वाटला होता आणि त्या संध्याकाळीं जिथें कल्पान्तापर्यंत थांबायला ती गेली होती—तिथें, त्या संध्याकाळीं, आपल्या सभोवार देवदूत आहेत, असा तिला भास झाला होता. तिथे, तिची दृढ धारणा होती, तिथें तिला आता सहाय्य मिळणार होतं.

श्वास अवरोधून टाकणाऱ्या त्या काळोखांत हवा कुंद पडली होती; वाफा टाकणारी उष्णता एखाद्या वजनाप्रमाणें तिच्या भोंवती लोंबकळत होती. वेलींची जाळीं त्यांच्या पायांत अडकत होती, आणि फांद्या त्यांचे कपडे ओढीत होत्या. तरीहि ती धडपडत पुढे जात होती, त्या नौदल सैनिकाला हाताला धरून खेचीत नेत होती; शेवटीं ती एका पाळाला अडखळून कोलमडली. आणि लटपटत खाली घसरत गेली. ॲलिसन सुद्धां एखाद्या मरणाऱ्या माणसाप्रमाणें खाली कोसळला. त्याचं तोंड मातींत होतं आणि त्याचा देह तिच्या पायावर पडला होता. तिने त्याचं तोंड हाताने चांचपडत आणि त्याला पाठीवर परतून घेतला. ती ओरडली, "तुला उठलंच पाहिजे. कृपा करून, मिस्टर ॲलिसन, ऊठ! पवित्र माते, त्याला बळ दे."

ॲलिसन हालला नाहीं. सिस्टर ॲंजेलाने वाकून त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलं. त्याचे तुटक, अवघडून येणारे श्वास तिने ऐकले व जाणले. त्याचा चेहरा आणि हात तिने चाचपून पाहिला. त्याची त्वचा तिला ओली व उष्ण वाटली. पुनः तिला भीतीचा झटका आला. परंतु आपली बोटे मण्यांवरून फिरवीत आणि प्रार्थना म्हणत, तो तिने दूर सारला. मग ती उठून उभी राहिली. आणि तिने आपले हात त्याच्या खांद्याखाली घातले आणि ती त्याला वर उचलण्याचा प्रयत्न करू लागली. तिच्या मानाने तो फारच जड होता. त्या श्रमानें दमून भागून ती त्याच्याजवळ कोसळली. मग एक काळा पडदा आपल्या मनावर पडल्याचा तिला भास झाला आणि पुढे तिला कांहीं कळलें नाहीं.

ती जागी झाली तेव्हा ॲलिसनचा हात क्षीणपणानें तिच्या चेहऱ्यावरून फिरत आहे असा तिला भास झाला. ती कांहीं बोलण्यापूर्वी त्याचा हात तिच्या केसावर आला, थांबला आणि पुनः मागे परतला.

"सिस्टर ?" त्याने क्षीणपणें विचारलं.

"होय," तिने उत्तर दिलं. तो अजून जिवंत आहे म्हणून मूकपणें तिने परमेश्वराचे आभार मानले.

"आपण कुठे आहोत ?" तो म्हणाला. "मला दिसत नाहीं."

"रानांत," ती उत्तरली. "पश्चिम किनाऱ्याकडे आपण चाललो आहोत. ते आपल्यासाठीं तेथें थांबले आहेत."

तिच्या हातावर त्याचा देह आनंदाने थरारत आहे असं तिला वाटलं.

"मग ते आले तर! ते बेटावर आहेत!" उठून बसण्याचा प्रयत्न करीत तो ओरडला.

अकस्मात तो कशाचा विचार करतो याचा तिला बोध झाला.

"मला म्हणायचं आहे कीं, तिथें देवदूत आहेत" आईबापांनीं लहान मुलाला समजावून सांगावं, तसं ती काळजीपूर्वक म्हणाली. "सैनिक नव्हेत—देवदूत. पूर्वीं ते माझ्याकडे आले होते. ते आतां थांबले आहेत. आपल्याला तिथें गेलेच पाहिजे."

"ओ, तसं!" एक दुःखपूर्ण आशाहीन उसासा टाकून तो म्हणाला.

त्या जोगिणीने काळोखांत आपल्या सभोवार पाहिलं, घाबरून. त्या अव्यक्त शक्तीने एकलं नसावं अशी ती आशा करीत होती. त्याच्या शब्दांचा अर्थ असा होतो कीं, जे तिचे सहाय्यक असाय-लाच पाहिजेत त्यांच्यावर त्याचा विश्वास नव्हता; आणि कसं तरी तिला वाटलं त्याच्या श्रद्धेशिवाय त्यांच्या सहाय्याची अपेक्षा ती करू शकत नव्हती. त्यामुळें, कदाचित, तिचा देखील विनाश होणार होता. पश्चिम किनाऱ्यावरील देवदूतांकडे ती कधींच जाऊन पोचणार नव्हती.






मग, अकस्मात, तिला लाज वाटली. त्या क्षणाला ती फक्त स्वतःचा विचार करीत होती, स्वतःला वांचविण्याचा, हें तिनं ओळखलं. शरमिंदी होऊन ती प्रार्थना करू लागली, "माझी कींव कर, माते, आणि तुला वाटतच असेल तर मला शिक्षा कर, परंतु माझ्या मित्राला शिक्षा करू नकोस. अनाथांच्या मंगल देवते, माझ्या मित्राचं संरक्षण कर."

मग ॲलिसन बोलला, "सिस्टर, खरंच तुला वाटतं कां ते—ते वाट पहात आहेत ?"

"होय."

त्याने उसासा टाकला. त्यांच्या जवळ कुठेतरी झुडुपांत अवजडपणे फिरणाऱ्या अदृश्य पशूचा आवाज ऐकू आला. तिच्या जवळचा ॲलिसनचा देह निःशक्तपणामुळें थरथर कापला. मग तिचा चेहरा धुंडाळीत त्याचा हात त्या काळोखांतून बाहेर आला.

"ऐक," तो म्हणाला, "ऐक. कसातरी माझ्या मनांत विचार येतो आहे– ठीक आहे...तुझं म्हणणं खरं असावं. मला कळतं त्यापेक्षां तुला अधिक कळत असावं. तुला हवं असलं तर आपण त्या तिकडे जाऊ."

एकाएकी ॲलिसन्‌ला आपला अंत जवळ आल्यासारखा वाटूं लागला. रात्रीच्या काळोखांतून एक भेसूर कृष्ण ढग आपल्यावर यऊन आदळतो आहे असं त्याला वाटलं. त्या क्षणावकाशांत मरण्याची क्रिया ही व्यक्तिवेगळी कल्पना राहिली नाहीं. ती एक भयानक वास्तवता बनली— अशी गोष्ट कीं, तो ती जवळ जवळ तिच्या तीक्ष्ण आणि भेदरून टाकणाऱ्या सत्य स्वरूपांत पाहू शकला. आकृतीविना आकार व आकाराविना आकृती, प्रचंड, थरकांप उडविणारी, अशी ती त्याच्या तापग्रस्त डोळ्यांसमोर उभी ठाकली. भयभीत अवस्थेंत आपलें सर्व बळ एकवटून तो ओरडला, "देवा ! स्वर्गीतील देवा ! बापा !"

क्षणांतच ॲलिसनला वाटलं कीं, स्वतः तें अरण्य मूक झालं होतं. जणू कांहीं त्याचं मन पडदा फाडून बाहेर निसटलं होतं, असा एक प्रकाशाचा द्रुतगति पण कालरहित काळ त्याला जाणवला. मग ती रात्र आणि तें जंगल, त्या जंगलांतील ते आवाज आणि गंध, पुनः त्याच्या सोबतीला आले. कुणीतरी त्याला ऊठ म्हणालं, आणि तो पायावर उभं राहाण्यासाठीं धडपडला. मग त्या जोगीणीकडे तो वळला आणि त्याने तिचा हात जवळ घेतला.

"चल" तो म्हणाला, "जाऊं या."

ती त्याच्याबरोबर चालू लागली, मूकपणें उद्‌गारीत, "त्याचा विश्वास आहे ! तो विश्वास ठेवतो !" ती अबोलकेपणें चालली, हळुहळु चालली, वारंवार विश्रांतीसाठी थांबत चालली.

परंतु ॲलिसनचं नवं चैतन्यबळ त्याच्या देहाला फार काळ आधार देईना. लवकरच त्याचा शारीरिक कमकुवतपणा डोकं वर काढू लागला, आणि केवळ त्या जोगीणीच्या दृढ इच्छा शक्तीनें त्यांना चालतं ठेवलं. तिने त्याला आधार दिला, वेळ पडतांच जवळ जवळ त्याला ओढीत नेलं. ते विश्रांतीसाठीं थांबले कीं, त्याला उभं धरून ठेवलं, कारण तिला भय वाटत होतं कीं, जर कां तो एकदा पुनः जमिनीवर पडला असता तर पुनः केव्हांच उठणार नव्हता.

ती त्या दिव्यांतून कशी पार पडली हें एकट्या परमेश्वराला ठाऊक, पण पहांटेचा पहिला करडा प्रकाश फांकला तेव्हां सिस्टर अँजेलानें आपणा दोघांनाही पश्चिम किनाऱ्यावरील त्या वालुकामय स्थळीं आणलं होतं. ॲलिसन एखाद्या मढ्यासारखा निपचित पडून होता. त्याचे डोळे मिटले होते; श्वासोश्वास घेतांना ती त्याला क्वचितच ऐकू शकत होती.

प्रार्थना करीत त्या किनाऱ्यावर त्याच्या जवळच सिस्टर अँजेला पडून राहिली. ती इतकी दुबळी झाली होती कीं, डोकं वर करण्या-इतकं सुद्धां त्राण तिच्यांत नव्हतं, परंतु हर्ष व मुक्तीच्या हळुवार संवेदनेनें तिची चैतन्यशक्ती शांत झाली होती. एका पवित्र वाणीच्या आज्ञेप्रमाणें आपल्या साथीदाराला ती इथवर घेऊन आली होती. ज्या सहाय्यासाठीं तिने प्रार्थना केली होती, तें त्यांना जिथें मिळणार होतं, तें ठिकाण हें होतं. या ना त्या रीतीनें अंत जवळ येत आहे हें तिने ओळखलं आणि सहाय्य पृथ्वीतलावरून येणार होतं कीं, स्वर्गांतून याची तिला फारशी पर्वा नव्हती.

सौम्य लाटांवरून समुद्र त्या किनारपट्टीवर आला. पहाटेच्या पहिल्या प्रकाशामुळें चांदी झालेला. सिस्टर अँजेलानें तो चंदेरी प्रकाश पाहिला आणि क्षणभर ती चिंतातुर झाली कारण दिवसाचा उजेड त्या सागरांतून वर घुसण्यापूर्वी मदत आलीच पाहिजे अशी तिची श्रद्धा होती. मग तिच्या क्षीण आणि मलीन मुद्रेवर एक विजयाची दृष्टी तरळली. पहांटेच्या त्या अंधुक प्रकाशांतून तीन मूक आकार समुद्राकडून चालत येतांना तिने पाहिले.



अनुक्रमणिका





सूर्यांच्या पहिल्या किरणांबरोबर तीन अमेरिकन सैनिक एकत्र मिळून ॲलिसन आणि सिस्टर अँजेलाजवळ आले. ते गुप्तपणें आले होते. दूर दक्षिणेकडील एका लष्करी तळावरून, दिवसा समुद्रा खालून वहात आणि रात्री समुद्रावरून ते आले होते. त्या बेटाची झडती घेण्याची कामगिरी त्यांच्याकडे होती आणि त्यांना शक्य असेल तें शोधून काढण्याची.

आतां, त्यांच्या पायांकडे, त्यांच्याखेरीज त्या बेटावर जें कांहीं मानवी होतं, तें सर्व पडून होतं

## [१६]

### अमुचा राम राम घ्यावा

**काळोखांत** उष्णता, वेदना आणि आजारीपण यांच्या मिश्रणानें ॲलिसन संत्रस्त झाला होता. काय घडतं आहे हें पाहण्याचा त्याने प्रयत्न केला, परंतु त्याचे डोळे तो उघडू शकला नाहीं. त्याने हांक मारण्याची खटपट केली तेव्हां तो कांहीं आवाज ऐकूं शकला नाहीं. त्याला चिंताग्रस्त वाटू लागलं आणि शेवटीं त्याला कळलं कीं, तो सिस्टर अँजेलासाठीं सचिंत झाला होता. त्याने तिला नांवानें हांक मारण्याचा प्रयत्न केला, परंतु पुन: आवाज बाहेर काढायला तो असमर्थ ठरला. स्वत:साठीं व तिच्यासाठीं तो दु:खमय झाला होता कारण तो कांहीं करूं शकत नव्हता.

मागाहून तो विचार करू लागला कीं, तिचे शब्द आपण ऐकले असावेत, ज्यांचा अर्थ आपणाला समजू शकला नव्हता. त्या शब्दांत परमेश्वराचं नांव समाविष्ट झालं होतं आणि मायेच्या हाताचा हळुवार व्हावा तसा त्यानी त्याच्या चित् शक्तीला स्पर्श केला होता. आणि त्या सर्व काळांत त्याचा झगडा चालला होता; त्याचं शरीर मरणाचा स्वीकार करण्यासाठीं धडपडत होतं आणि त्याचं चैतन्य देह सोडण्याचं नाकरीत होतं.

मग, अचानक, त्याला आढळून आलं कीं आपलं शरीर थंड व अशक्त झालं आहे आणि आपण पाठीवर पडलेले असून एक पांढरं छप्पर आपल्या डोक्यावर आहे. आपली ताकद वाढत आहे असं त्याला वाटलं आणि त्याला डोकं वळवतां येत होतं. त्यानं पाहिलं कीं, आपल्याजवळपास बिछाने आहेत, बिछाने कीं, ज्यांत माणसे आहेत. एक दुसरा क्षण त्याने टक लावून पाहिलं. मग, हें स्वप्न नाहीं याची खात्री पटून, महान मुक्तीचा निश्वास त्याने सोडला आणि तो झोपी गेला. यावेळीं तो शांतपणे झोपला, स्वप्नांशिवाय.

तो जागा झाला तेव्हां त्याच्या बिछान्याच्या टोकाला एक रुग्ण-सेविका उभी होती.

"हॅलो," तो म्हणाला.

"हॅलो" ती सेविका म्हणाली. "म्हणजे तूं पुन: आमच्यात आलास !"

"सिस्टर अँजेला ?" त्याला काळजी वाटू लागली.

"सैनिका, तूं आतां मुळींच काळजी करू नकोस. माणसाला जेवढं म्हणून आजारी पडण्यासारखं शक्य आहे, तितका तूं आजारी होतास, पण आता सर्व कांहीं ठीक आहे." ती म्हणाली.

"सिस्टर अँजेला ! सिस्टर अँजेला कुठे आहे ?" त्याने आपला स्वर शांत ठेवण्याचा प्रयत्न केला, परंतु एखाद्या किंकाळीसारखा तो घुमला.

अकस्मात एका श्वेतवस्त्रधारी मनुष्याने त्या सेविकेला साथ दिली.

"काय गडबड आहे ?" ह्या माणसाने विचारलं.

"गडबड कांही नाही, महाराज," ॲलिसन म्हणाला, "सिस्टर अँजेला कुठे आहे ? ती—"

डॉक्टरनें त्याला जवळून बारकाईनें पाहिलं. मग त्याची चर्या पालटली. तो जें बोलत होता तें ॲलिसनला कळत होतं असा त्याने उघडच निर्णय घेतला.

"कांहीं काळजी करू नकोस" तो म्हणाला, "सिस्टर अँजेला बरी आहे. तिच्याबद्दल मी चौकशी करीन. मी तिची चौकशी करीपर्यंत काळजी न करण्याचा प्रयत्न तूं करशील काय ?"

"नक्की," ॲलिसन म्हणाला. "मला समजलंच पाहिजे. म्हणजे झालं."

नंतरच्या कांहीं तासांत ॲलिसनला लष्करी माणसांनीं भेट दिली व त्या बेटाबद्दल आणि तेथील जपानी सैन्याबद्दल त्याला प्रश्न विचारले. या भेटलेल्या लोकांकडून त्याला कळलं कीं, 'सिस्टर-ऑफ-मर्सी' हॉस्पिटलमध्यें सिस्टर अँजेलाला तिची प्रकृती पुन: प्राप्त करून दिली जात होती. त्याला कळलं कीं तो स्वत: ऑस्ट्रेलियांत टॉऊन्सव्हिले येथील अमेरिकन इस्पिळांत होता. तापाने मरण्यांत त्याने बारा दिवस घालविले होते आणि पुन: जीव येईपर्यंत चार दिवस, असा त्याला बोध लागला.

दुसऱ्या दिवशीं एका धर्मगुरुला त्याच्या बिछान्याजवळ आणण्यांत आला.


भूसेवा मंडळाचा फंड खाल्यामुळें आतां वृद्ध सेवा मंडळाचा फंड उभारतो आहे

"मी फादर जेम्स," तो धर्मगुरु म्हणाला, "मी सिस्टर अँजेलाजवळ बोललो आहे. मला म्हणायचं आहे—" परंतु तो कांहीं बोलू शकला नाही. फक्त त्याने दोन्हीं हात त्याच्याजवळ नेले आणि ॲलिसनचे क्षीण, हाडकुळे हात हातात घेतले व घट्ट दाबले. मग त्या धर्मगुरुनें आपलं मस्तक वांकवलं आणि शब्दांची पुटपुट केली. ते ॲलिसनला ऐकू आंले नाहींत.

"चमत्कार आहे," मग फादर जेम्स म्हणाला, "तो एक परमेश्वरी चमत्कार आहे."

"होय," ॲलिसन म्हणाला. त्या शब्दांचा अर्थ त्याला पूर्णपणें कळला नाहीं, परंतु ते आपलेच विचार व्यक्त करताहेत असं त्याला वाटलं.

ॲलिसनने धर्मगुरुकडे दृष्टी फेकली, आणि पाहिलं की तो हंसत होता.

"ती आली आहे," फादर जेम्स म्हणाला, "तुला लोक भेटू शकतात हे ऐकल्यावरोबर तिने येण्याचा आग्रह धरला. तुझी तयारी करण्यासाठीं मी प्रथम आलो आहे. आता मी तिला बोलावूं काय ?"

"निश्चितपणें," ॲलिसन म्हणाला. माझी तयारी करण्यासाठीं म्हणजे काय म्हणाला तो, तो विचार करू लागला.अशा मूर्ख विचाराबद्दल जवळ जवळ त्याला हंसावंसं वाटलं. सिस्टर अँजेलाची भेट घेण्यासाठीं कुणी त्याची तयारी करण्याची जरुरी नव्हती. मग, अकस्मात्, त्याला भीतीचं कापरं सुटलं. तिला दुखणं तर झालं नाहीं ना ? ती आंधळी किंवा आणखी कांहीं झाली नसेल ना ? तिच्यांत कांहीं भयानक बदल घडला होता म्हणून तर ते त्याची तयारी करीत नव्हते ना ?

ती त्या इस्पितळाच्या खोलीत येऊ लागली तशी तिला पहाण्यासाठीं आपल्या बिछान्यांत उठून बसण्याची शिकस्त तो करू लागला. दुसरी एक जोगीण तिच्याबरोबर चालत होती; फादर जेम्सच्या मागून दोन जोगीणी चालत होत्या. त्याने त्यांना ॲलिसनच्या बिछान्याजवळ आणलं. ॲलिसनने फक्त सिस्टर अँजेलाला पाहिलं आणि तिच्या दर्शनाबरोबर एक अकल्पित हर्षसुख त्याच्या रोमरोमांत भिनलं.

आपल्या धार्मिक संप्रदायाप्रमाणें तिने वस्त्रें परिधान केलीं होतीं. ती निर्धारपूर्वक आणि साभिमान, प्रतिष्ठेनें आणि तरीहि विनम्र अशी चालत आली. एक महान् आनंद तिच्या देहांतून बाहेर ओसंडत होता व ती खोली भरून टाकीत होता असं भासत होतं.

"सिस्टर" तो म्हणाला, आणि कांहीं अधिक बोलू शकला नाहीं.

"प्रिय मिस्टर ॲलिसन. किती चांगलं—तुला भेटतांना किती चांगलं वाटतं आहे." तिचा स्वर मंद आणि स्पष्ट होता. इवल्या इवल्या घंटा वाजाव्यात तसा तो निनादित होत होता.

प्रारंभीं त्यांचं संभाषण सामान्य व सर्वसाधारण विषयांवर होतं. तेथें उपस्थित असलेल्यांच्या फायद्यासाठीं ती बोलत होती. परंतु फादर जेम्स हा समजदार माणूस होता. कांहीं क्षणानंतर सिस्टर अँजेलाच्या सोबतीणीबरोबर त्याने स्वतंत्र संभाषण करायला सुरुवात केली आणि शांतपणें तिला दूर नेलं.

"सिस्टर," ॲलिसननें म्हटलं, "कांहीं फारसं बोलण्यासारखं माझ्याजवळ नाहीं. माझ्यासारखा मनुष्य. शब्द सहज येत नाहींत, मला वाटतं. तुला ठाऊक आहे मला कसं वाटतं—म्हणजे-अच्छा, वस्तुमात्राबद्दल."

"कृपा कर," तिने म्हटलं, "तूं प्रयत्न करूंच नको. मी जाणते. हो, खरोखरच, मी जाणते."

"मला वाटतं तूं माझा जीव वाचवलास." त्याने सुरुवात केली.

"नाहीं," ती म्हणाली, "परमेश्वरानें आपणा दोघांना वाचवलं, मिस्टर ॲलिसन. मी तुला वाचवलं नाहीं; तूं मला वाचवलं नाहीं. आपल्यापैकीं कुणीच, आपल्यापैकीं एकेकटा, एकमेकाला वाचवू शकला नसतां. परमेश्वर तो. तुला तें ठाऊक आहे."

"होय," तो म्हणाला, "मला ठाऊक आहे कीं, तें खरं आहे."

"पुन: मी तुला भेटेपर्यंत दीर्घ काळ लोटण्याचा संभव आहे," सिस्टर अँजेला म्हणाली. "मी आज रात्री ऑस्ट्रेलियांतून जायला निघणार आहे. म्हणून मला वाटतं हा 'राम राम' आहे."

त्याच्या दुबळ्या चर्येवरील भयचकित भाव पाहून तिने आपलं मस्तक वाकवलं होतं.

मूर्खपणा न करण्याबद्दल स्वत:ला बजावण्याचा त्याने प्रयत्न केला. अर्थातच तें घडणारच होतं. तो एक सैनिक होता आणि ती एक जोगीण होती. आता ती दोघे आपापल्या लोकांत परत आली होती, मुक्त, सुरक्षित. शक्यतर साथीदार म्हणून त्यांना यापुढेही राहणं कसं शक्य होतं ? परन्तु कांहींतरी हरवून बसल्याची एक मन व्यापणारी भावना तो थांबवूं शकला नाहीं.

सिस्टर अँजेला, जिने त्याला इतकं चांगलं ओळखलं होतं, त्याच्या मनांत घोळणारे विचार जवळ जवळ जाणूं शकली. न बोलता येणारे शब्द डोळ्यांत सांठवून किती वेळ कालविरहित होऊन तिने त्याच्याकडे पाहिलं.

"हें युद्ध आहे, माझ्या मित्रा," ती पुटपुटली. "आणि मला नियमांचं पालन केलंच पाहिजे, जसं नौदलांत तुला नियमांचं पालन केलंच पाहिजे. मला वाटतं, तुला जें कांहीं वाटतं, त्यांतलं थोडंफार मला समजलं. कमी अधिक लवकर किंवा उशीरा आपल्यावर एकमेकाला राम राम म्हणण्याची पाळी यावयाची होती. पण हो, हा कांहीं खरा रामराम नव्हे. हा तर फार थोड्या वेळासाठीं आहे." शब्द धुंडाळीत ती थांबली. त्यांची तिला गरज नव्हती, कारण एकाएकी ॲलिसन समजायचं तें सर्व समजूं शकला. एका अविस्मरणीय क्षणांत त्या रात्री परमेश्वराला आळवीत जसा तो त्या जंगलांत होता, तसंच त्यानं स्वत:ला पाहिलं. आणि त्या रात्रीप्रमाणेंच त्याचं मन एका आवरणाचा छेद करून बाहेर पडत आहे असा त्याला भास झाला.

"सिस्टर," तो मंदपणें म्हणाला, "तुला तें सांगण्याची जरुरी नाहीं. मी जाणतो."

"देवाच्या पवित्र माते," दु:खानें आणि आनंदानें मूकपणें रडत, ती गुणगुणली.

क्षणांतच, जेव्हां पुन: त्या दोघांनीं आपापल्या भावनोद्रेक काबूंत आणला, सिस्टर अँजेला म्हणाली, "अच्छा, मला खरोखर गेलंच पाहिजे. मी तुझी काळजी करीत राहीन, मिस्टर ॲलिसन तूं धडधाकट झालास कीं, तूं मला लिहिलंच पाहिजेस आणि तुझं कसं चाललं आहे तें कळवलं पाहिजेस. नुस्तं ऊर्सूलीन संप्रदाय, कॅनडा, इथें तुझं पत्र पाठव. माझ्या हातांत ते पडेल याची खात्री ठेव. मी त्याचं स्वागत करीन याबद्दल निश्चित रहा."

तिच्याच विचारांचं तिला किंचित हंसूं आलं. "मग रणांगणांवरून सुद्धां एक सैनिक मला पत्र लिहीत असेल." ती थांबली, मग त्याच्यावर ओणवी झाली. "राम राम, माझ्या प्रियतम मित्रा आणि साथीदारा." ती हळू गोड आवाजांत म्हणाली. "नेहमीं परमेश्वराची सोबत तुला लाभो. आपली पुनर्भेट होईपर्यंत तूं जिथें कुठे असशील, जें कांहीं करीत असशील, तिथें तो तुझ्या सोबतीला असेल अणि मी तुझ्या सोबतीला असेन."

"होय." अत्यंत अवघडपणें शब्द उच्चारीत तो म्हणाला, "राम राम, सिस्टर."

ती दूर वसली आणि दुसऱ्या जोगीणीकडे गेली. फादर जेम्स पुढें सरकला आणि त्याने ॲलीसनशी हतस्तांदोलन केलं. "लवकरच मी तुझी गाठ घेईन" तो म्हणाला.

"होय" ॲलिसननें म्हटलं, "जरुर."

त्या दोघी जोगीणींना त्याच्यापासून दूर त्या दाराकडे चालत जातांना तो निरखून पहात होता. फादर जेम्स त्यांच्या मागून चालत होता तें त्यानं न्याहाळलं. त्याला हें सुद्धां ठाऊक होतं कीं, त्याच्या भोंवतालच्या बिछान्यांतील इतर पुरुष त्याच्याकडे आणि त्या जाणाऱ्या जोगीणींकडे आणि त्या धर्मगुरुकडे स्तब्धपणें निरखून पहात होते. परंतु ह्या घडामोडी त्याने लक्षांत घेतल्या नाहींत. त्याचं सर्व विचारवळ केंद्रीत झालं होतं सिस्टर अँजेलाभोवती. ती दूर दूर चालत गेली तशी त्याने आपली नजर तिच्यावर खिळवून ठेवली होती.

दरवाजाकडे हालचाल थांबली. मग सिस्टर अँजेला वळली व त्याच्याकडे तिने परतून पाहिलं. तिच्या गळ्यांतील जपमाळेच्या मण्यांवरून तिचें हातमोज्यात असलेले हात फिरत होते. एक स्थिर क्षण ती तिथें उभी राहिली. मग ती निघून गेली होती.

ॲलिसनने आपले डोळे मिटले. हॉस्पिटलांच्या त्या खोलींतील बोलण्याची कुणकुण व आवाज त्याने ऐकले. परंतु तो त्या पलिकडे गेला होता. एकटाच, आपल्या विचारांत. एका न बोलता येणाऱ्या कांहीं हरवल्याच्या भावनेने त्याचं हृदय उचंबळून येत होतं. मग त्याच्या मनाच्या काळोखांत सिस्टर अँजेलाची मुद्रा त्याच्या दृष्टीस पडली. किंवा त्याने कांहीं तरी तेजस्वी पाहिलं कीं, जें सिस्टर अँजेला होतं. मात्र तें तिच्या शरीरिणी आकारांत किंवा स्वरूपांत नव्हतं.

हळुहळु त्याला दिसूं लागलं कीं, ती एकटी नव्हती; ती अशा एका अस्तित्वाजवळ होती कीं जें इतर अनेकांनीं भोंवतालून वेढलं होतं आणि त्या सर्वांच्या भोंवती अवर्णनीय असा प्रकाश होता. ती एकटी नाहीं हें जसं त्याला उमजलं तसंच आता, आपण एकटे नाहीं याची समज त्याला पडू लागली. तो आता पुन: कधींच एकटा रहाणार नव्हता.

त्याच्या देहांतून नवी शक्ति सळसळू लागली आणि पूर्वी कधींही नव्हतं इतकं त्याचं मन त्याला अधिक स्वच्छ दिसूं लागलं. त्या दूर रात्रीं, ज्या रात्रीला आतां किती काळ लोटून गेला होता, त्या बेटाच्या किनाऱ्यावर उतरलेला तो ॲलिसन, तो नव्हता, हें त्याला समजलं. आतां तर ती फार फार दूर गेल्यासारखी त्याला भासली; कारण आतां त्यांच्यांत परिवर्तन घडून आलं होतं.

आपल्या नव्या शक्तीचा त्याला अभिमान व निश्चिती वाटली, कारण आतां तो त्याच्यासमोर एक स्पष्ट मार्ग पाहूं शकत होता, जिथें कुठे तो जाणार होता आणि जें कांहीं तो करणार होता. तेथें तेथें, आता, त्याला चालतांना पवित्र सोबत लाभणार होती. आणि युद्धांत किंवा शांत काळांत जे कुणी इतर सर्व लोक त्याचं ऐकणार होते, त्यांना त्याबद्दल तो सांगणार होता. त्याला त्यांना सांगायचं होतं कीं, या जगांतून श्रद्धा आणि धैर्य नष्ट झालेलं नाहीं; भलेपणा आणि सत्य अजून टिकून आहे.

• • •

**[दीपावलींतून क्रमशः प्रसिद्ध होत असलेली ही एक आगळी जीवनगाथा ह्या अंकीं समाप्त होत आहे. पुष्कळशा वाचकांनीं आवर्जून पत्रें पाठवून तिचें स्वागत केलें. आतां ती पूर्ण झाल्यावर रसिक वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया जरूर कळवाव्या. —संपादक.]**






........वडे गुलाम अलींचा रसीला
बुलंद आवाज गांधार
आळवीत होता. निळ्या भर्जरी
प्रकाशाच्या वरसातींत चांदण्याचें
अत्तर मिसळीत होता.
प्रियकराचा
परदेस
नेत्राची कळशी
भरून रिती करीत
होता........



# उत्तर

—सुरेश रघशेट्टी

**मित्राला** दाखविण्यासाठीं स्वेटर काढला; अन् मत्त करणारा दरवळणारा राजा सुगंध नाकांत शिरला. नाकांतून थेट हृदयांत घुसला तीरासारखा. कळ उठली त्याच हृदयांतून. आठवणींचं मोहोळ जागं झालं. वेदना सलू लागल्या भोगलेल्या दुःखाच्या. झेललेले बुजत आलेले घाव उसवले. भेसूर अंतरूप सामोरं आलं. अवमानित. वंचित.

उसवलेले टांके जुळवीत तूं दिवाणखान्यांत वसून होतीस. तुझ्या शेजारीच अगदीं कांहीं हातांच्या अंतरावर मीं बसून होतो. माथ्यावर दरड कोसळल्यासारखा. मेंदूवर बर्फाचा वर्षाव झाल्यासारखा थिजून. अस्ताव्यस्त होऊन.

बोलणं सुचत नव्हतं म्हणून कीं अंतरांतले सूर संवाद साधीत होते म्हणून. . . तूं बसून होतीस मूकपणें ओलसर ओंठांची मिठी न उलगडता. पण तुझं ऊर ! केवढ्यानं धडधडत होतं तें ! वस्त्रांच्या तंग बंधनांतूनही त्याची वरखाल जाणवत होती. माझ्या जिभेवर शब्दांची रांग खोळंबून होती. सुरुवात हवी होती. अनुमोदनासाठीं पण भोंवतालचा मूक पहारा तुला रोखीत असावा.

कोण जाणे ! तुझी स्वप्नें कोणती होतीं ? कोणत्या विशिष्ट दृष्टिकोनांतून मी तुला हवाहवासा वाटलो. अन् आतां समोर येऊनही तूं उचंवळून येऊं नयेस इतकं परकेपण घेऊन बसलो होतो. खरंच कां माझ्यावर प्रेम करीत होतीस ?

माझ्यासाठीं अश्रू सांडण्याइतकं उत्कट प्रेम ! माझा विरोध नाजुक हातांनीं दूर केलास. मिठींत घेतलंस. स्वप्नं फुलवलींस. दुनिया वसवलीस. राज्य दिलंस. आणि. . . केवळ एकच एक आघात केलास.

सारं सारं छिन्नविच्छिन्न झालं. वघतां वघतां सारं अदृश्य झालं. हिरावून घेतलं गेलं. चोंचीतला गोडवा निरखतां निरखतां नख नरड्यावर बसलं अन् सूर तडफडून मृत्यू पावले !

मृत्यू ! त्यालाही तूं विरोध केलास. स्वतःसाठीं सप्तरंगीं भोगविश्व निर्माण करतांना माझ्यांतील पात्रता तुला शोभेलशी हवी होती. कधींच दूर न होणारं अंतर ओलांडतांना आपला तोल जाणार नाहीं याची काळजी केली कीं, माणूस नेमका खड्ड्यांत पडतो. अन् धडाडीनं टाकलेली झेंपच काठावर हंसत उभी राहूं शकते.

तूं लिहायचीस विदुषीसारखी. तुला सारं सत्य, शिव सुंदर हवं होतं. पण कधीं कधीं सौंदर्याची स्थापना करतांना सत्यावर आवरण पडतं तसं तुझ्या ध्येयवाद निर्मितीच्या वेळीं माझं रूप, शिक्षण तुझ्या डोळ्यांआड झालं. माझी आश्वासनं तुला दुबळीं अपुरीं वाटलीं. विरोधकांचीं मनं तूं वळवूं शकत नव्हतीस अन् भयाण अंधाऱ्या दरडीवर एकाकी पारवा घुमत होता उदास होऊन. वंचनेचा तीर उरांतून उपसून काढतांना होणारं भळभळतं वहातं दुःख सांवरीत.

तमा कुणाची कुणालाच नव्हती. यमुनेचे तीर भुकेजून वसले होते दोन मनांची प्रीत साकार समूर्तलेली पहायला. लाटेवर लाट येत होती. फुटत होती. वाळूला तडे पडत होते. ती आंत घुसत होती.







अनुक्रमणिका

अंतर्याम डोहांत खोलवर भरून राहिलेला वर्फाळ अंधकार पिऊन घोरत होतं.

नखावरली चमचमती मेंदी न पुसेलशा बेतानं बोटांनीं (थरथरत्या ?) माझे आंसू पुसण्यासाठीं फार दूरून तूं हालचाल करीत होतीस. चिकनची साडी मळणार नाहीं. तिची घडी विसकटणार नाहींशा बेतानं तूं माझ्याजवळ उभी होतीस. निळ्या आरसेमहालांत उभ्या असलेल्या ओलेत्या परीसारखी ! कोण जाणें तुझ्या उरांत काय उसळत होतं. दुःखाचा डोंब. सुटकेचा आनंद कीं, वळी गेलेल्या वावळटावद्दलचं निरर्थक निरर्गल हंसूं. कोण जाणे तुझं तुझ्या प्रतिबिंबाकडे लक्ष होतं कीं नव्हतं. विचारमग्नता हेंच तुझं आकर्षण. गोड चेहरा विचारमग्न असला कीं, अधिकच मोहक असतो. रेंखून वसवलेल्या आंखूड कुरळ्या केंसांच्या बटा. डोळ्यांत हलक्या हातांनीं कोरलेलं काजळ. हलक्या हातांनीच ल.वलेला, गालांवरल्या सांवळ्या पाकळ्या खुलवणारा पावडरचा थर अन् तीं नाजुक स्निग्ध बुद्धिमंत बोटं. खरं सांगतों; त्या एका अंगठींत माझं मन गुंडाळलं गेलं होतं. तूं चोरून दिलेल्या भेटवस्तूवर गुंडाळलेल्या कलावतूच्या हातरुमालासारखं.

पण मला तें दडवून ठेवावं लागत होतं. ट्रंकेच्या तळाशीं ठेवलेल्या भेटवस्तूसारखं.

कोण जाणे आपण काय बोलणार होतो. पण सप्तपदी चालली होती दोन मनांची. नेत्र आळवीत होते भावगीतें. एकमेकांच्या डोळ्यांत खोलवर डोकावून काय पहात होतों आपण ! काय ?

केवढ्यांदा दचकलीस तूं ! जिन्यावर पावलं वाजलीं म्हणून. अन् वहाणा चालू केलास पुस्तकांत रंगून गेल्याचा. माझ्या अस्तित्वाची जाणीव नसल्याचा. पोरं खटयाळ खरींच. त्यांनीं काय ओळखलं त्यांनाच ठाऊक पण कार्टी हंसत होती. वेगुमानपणे.

मोगरींतून दरवळावा मत्त गंध. मनं न्हावींत धुंद. तसं अंतरांतून स्त्रवणारा युगायुगांचा स्नेह दरवळत होता. एकमेकांना निरखीत होता.

मीलन ! जवळ असूनही फक्त मनं भेटलीं देहांना आस होती कीं, नव्हती कोण जाणे. पण डोळ्यांत पेटलेल्या ज्योती पूर्ण अभिलाषेच्याच होत्या.

आणि तुझे डोळे पाणावले. झरझरत आंसू ओघळूं लागले. आणि आश्चर्य ! हंसतमुख राहाण्याचं नाटक सांभाळतां सांभाळता तेच अश्रू माझ्या नयनांत उतरले. गंगा यमुनेचा संगम होत होता. एक अपूर्व भेट साकार होत होती.

आणि तूं वांध घातलास ! डोळे पुसलेस. चेहरा इतका कठोर, मख्ख केलास कीं, मला मग नाटकी बेफिकिरी शीळरूपानं साजरी करीत बाहेरची वाट धरावी लागली.

मला माहित नव्हतं. तूं कठड्यावर ओठंगून उभी आहेस म्हणून. बागेंतल्या फुलांना कुरवाळतांना तुझी रेशमी बोटं जणुं माझ्या काळजावरून फिरत होती. मी थांवलो रस्त्यांत दोस्त भेटला म्हणून. आणि सहज म्हणून डोळे वळले तुझे व्याकुळ नेत्र पाहून पुन्हां खाली झाले. आणि मी बोलण्यांत रंगून गेलो. चालत आम्हीं दोघांनीं चौक ओलांडला कारण मला सिगरेट ओढायची होती. अविभक्त खात्रीच्या हक्काच्या मैत्रिणीचा विश्वास पारखायचा होता. तहानेल्या ओठांनीं परतलो त्यावेळीं वडे गुलाम अलीखांचा रसीला बुलंद आवाज गांधार आळवीत होता. निळ्या भर्जरी प्रकाशाच्या वरसातींत चांदण्याचे अत्तर मिसळीत होता. आवाजांत विरह होता. वेचैनी होती. काळजाला भिडणारी आर्तता होती. पक्वान्नांचा सुवास नाकाशीं दरवळत होता. अन् प्रियकराचा परदेस नेत्राची कळशी भरून रिती करीत होता. हिंदकळल्या दुःखाच्या लाटेवर तरंगणारा विरह साद घालीत होता. मी बाहेर थांवलों कितीतरी वेळ तें मधुर दुःख पीत.

कोणीतरी रेडिओ वंद केला. अन् मी भानावर आलो. स्वप्नांतल्या प्रियतमेला भेटायला आतुरलेल्या प्रियकराच्या पावलांनीं उंवरठा ओलांडण्याचा प्रयत्न मला लोटांगण देऊन गेला. अन् सारे हंसू लागले.

तूंही हंसलीस. केवळ दुसऱ्यांना संशय नको म्हणून. पण तुझा व्याकुळ पुसट प्रश्न मला ऐकायला आला, फार लागलं नाहींना ?" मी वेध घेतला. चकित करणाऱ्या त्या प्रश्नाचा. तो तिथें नव्हताच !












तीच ओठांची मिठी. तीच नाटकी बेपर्वाई ! पांखरांचं मन घेऊन जन्माला जरुर यावं. पण पाखरांचचं काळीज असलं कीं, छाटल्या पंखांचं दुःख सहन करतं काळीज अन् काळजातलं शल्य उपसत असतं जीवनभरांतलं दुःख.

दुःख चेहऱ्यावर असतं. बोलण्यांत वसतं. हालचालीतून उतरतं. पण पापणीच्या दाराआड इतक्या दाट छायेखालीं ते लपलेलं असतं कीं आविर्भाव जाणत्याच्या काळजाला पीळ पाडतो. मग अभ्यागताकडं बेपर्वाईचा आहेर जातो. कटुता, निःशब्द चालीनं त्याला घेरते. अन् तो हतबुद्ध होतो.

दोन वेळां मी खालीं गेलो. अंगणांत फेऱ्या घालीत राहिलो. रातराणीचा गंध हुंगीत. चांदण्या मोजत काळजाच्या जखमेवर विवेकाची फुंकर टाकीत. दोन्ही वेळां दिवा लावला गेला. वस्त्राची सळसळ पाहण्याचा केविलवाणा प्रयत्न सांगत होती. पण तडफडणारं मन बदलेल नव्हतं.

अनेक घाव त्यानं झेलले होते: तसाच आणखी एक पहिल्या घावाची कळच अधिक दुखरी. जीवघेणी असते. पाठच्या साऱ्या झेंपावतात संवेदनाशून्य कातडीवर. केवळ खुणा कोरण्यासाठीं. क्वचित् एखादी अस्थींचा वेध घेते कळ अधिक गहिरी करीत. पण अपूर्वाई पहिलीचीच.

स्त्रीजात पारध कुशल म्हणून नांवलौकिक मिळविण्यासाठींच अस्तित्वाच्या खुणा वाळगते कां ? कीं ममतेचा आविष्कार अपत्य-वात्सल्यांतच व्हावा म्हणून ? मग शृंगार ? शून्यांतून विश्वाची निर्मिती होते हें सांगणारं प्रतीक ! कीं अगतिक वासना शमनासाठीं फुलणारा शरीरधर्म !

जगांतल्या साऱ्या सौंदर्याचा हव्यास असतो तुमचा पण सौंदर्याच्या निर्मात्यांना गरज अन् तडजोड म्हणून स्वीकारतांना तुमचे चेहरे असे कांहीं मजेदार भासतात कीं, त्यावेळीं तरी पुरुषाच्या चेहऱ्यावर विलसणारं विजयाचें अखंड स्मित पाहतांना समाधान वाटतं. मालकी हक्काची याहून दुसरी पताका नकोच दुसरी !

मला हक्क सांगायचा नव्हता. तुझी विनंती मानायची होती. पारधाला बळी पडायचं होतं. मी अजापुत्र नव्हतो तिर्यक नव्हतो तरीही जीवनांतील कणाकणाचा क्षणाक्षणाचा आस्वाद रसिकतेनं रंगेलपणानं घेण्याची क्षुधा होती मला. घांस हवा होता अनन्यसाधारण अनुभवाचा !

पण नियतीच्या हातीं होता तीर. वंचनेचा. अपेक्षाभंगाचा. कोमल निष्पाप काळजाचा वेध घेऊन खदखदां हंसणारा. भक्ष्य सामोरं येत होतं. निडरपणानं.

तीर डोळ्यांना दिसत होता. तरी.

जरासुद्धां आवाज झाला नाहीं. फक्त भळभळती जखम सलणारी कळ. अन् ओंठ गच्च आंवळून सहन केले जाणारे जळजळीत तिरस्कारपूर्ण शब्द.

खरंच ! माणूस रडतो केव्हां ? पित्याच्या देहावसानानंतर, अवघड परीक्षेंत अनुत्तीर्ण झाल्यावर कीं, साऱ्या स्वप्नांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या म्हणून !

पूर्ण दुःखाचा हृदयंगम आविष्कार करणारे अश्रु ! दोन मनांचा संगम साधणारे अश्रु !

तिसरी धारा लुप्त असते वंचनेची. अकस्मात् दृग्गोचर होते वीज दिसावी तशी अन् मिठी मारल्या अवस्थेंत वृक्षाला बिलगलेल्या सुकुमार वेलीची राख करून जाते. उरते फक्त राख.

खरंय् राधा ? बोल. . . . !

●●●

# अऽहऽह !!

## गैरसमज करून घेणार नाहीं !

स्नेहसंमेलनानिमित्त खेळाचे सामने चालू होते. खेळणारेहि खेळाबद्दल बेफिकीर–प्रेक्षक प्रेक्षणीय ! ह्या गंमतीत आणखी गंमतीचा भाग म्हणजे स्टेजवरून येणाऱ्या सूचना व खेळाचे धांवतें समालोचन एका बाजूच्या खेळाडूंनीं शिटी वाजतांच धांवत जाऊन विरुद्ध बाजूच्या खेळाडूंच्या हातांतल्या मेणबत्त्या पेटवावयाच्या व पुन्हां पळत यावयाचे. असा हा खेळ. मेणबत्त्या भरपूर होत्या. वाण होती ती काड्यापेट्यांचीच. स्टेजवरून सूचना देणाऱ्या प्रा. सरदेसाईंनीं विद्यार्थ्यांना एक विनंति केली.

विद्यार्थ्यांना नम्र विनंति. त्यांनीं आम्हांला थोडावेळ आगपेट्या द्याव्यात. घाबरूं नका. तो तुम्हीं सिगारेटी ओढतां याचा पुरावा समजला जाणार नाहीं.

एवढें आश्वासन मिळूनहि कित्येक विद्यार्थ्यांना खिशांतून आगपेट्या काढण्याचें धैर्य झाले नाहीं ही गोष्ट वेगळी !

● ● ●

## अजून अवकाश आहे !

'आयला–रेखा सावंतनें रघू जगतापला शेंडी लावली रे'

'काय–झालं तरी काय ?'

'दुसरं काय–गॅदरींगला त्यांची जोडी–खेळांत जोडी–लायब्ररीत तासन् तास गप्पा मारायचे'

'बरं मग ?'

'तिचं लग्न ठरलंय्. कुणाशीं माहीत आहे ? संजय दिवाण म्हणून ऑफिसर आहे म्हणे ए. सी. सी.त.

'रघूला मामा बनवला कीं रे'

'ऐकला तुमचा संवाद' तेवढ्यांत तिकडून रेखानें येऊन सांगितलं. ती लाजून म्हणाली,

'इश्श ! असं काय बोलतां इतक्यांतच ? रघू माझ्या भावासारखा आहे. पण त्याला मामा बनवायला अजून अवकाश आहे !'

– माधव अत्रे

## वाटलंच मला !

"रावसाहेब," जज्ज-साहेब तरुण वकिलाला म्हणाले. "कोर्टांत केस लढविण्याची ही तुमची पहिलीच खेप आहे. खरं ना ?"

आपलें काय चुकलें तें वकीलसाहेबांना समजलें नाहीं.

"येस्, युवर ऑनर," ते म्हणाले.

"वाटलंच मला," जज्ज-साहेब म्हणाले. "रावसाहेब, केसला सुरुवात करण्यापूर्वी ती हॅट आणि तो कोट उचला आणि तुम्ही आत्तां उभे आहांत तिथून तुम्हांला त्यांवर नीट लक्ष ठेवतां येईल अशा ठिकाणीं ठेवा."

–वि. रा. भाटकर











# स्वप्न

**खरे** काकांच्या छोट्या पण टुमदार बंगल्याच्या पायऱ्या चढणाऱ्या सुलभाच्या अंगावर कोरी साडी होती. तिला शोभेलसा ब्लाऊज होता. हातांतील बांगड्या पाटल्यांचे झगझगीत पॉलिश त्या वापरून फार दिवस झाले आहेत असें भासवीत नव्हतें ! गळ्यांतील कोरें करकरीत मंगळसूत्र 'नवविवाहित' असें आवर्जून सांगत होतें. बरोबर असलेल्या विद्याधरांचा नवा कुलनचा सूट तरी दुसरं काय सुचवीत होता ?

पण घरच्या माणसांच्या संमतीनें प्रेमविवाह निर्विघ्न पार पडलेल्या या नूतनपरिणित जोडप्याच्या चेहेऱ्यावर मात्र आढळायला पाहिजे तेवढें सुखसमाधान आढळत नव्हतें.

हें सगळं एका दृष्टिक्षेपांत टिपून घेणाऱ्या खरे काकांना वाटलें कीं, कांहींतरी क्षुल्लक कारणावरून दोघांत प्रेमकलह झाला असावा, नि नेहमींच्या सरावानें सुलभा त्यांच्याकडे कैफियत सादर करायला, सल्ला मागायला आली असावी. फरक एवढाच कीं, बरोबर आज ती आपल्या पतिराजांना घेऊन आली होती.

आपण कांहींच पाहिलें नाहीं असें भासवीत अत्यंत प्रसन्नपणें हंसून ते पायऱ्या चढून आंत येऊन, नमस्कार करण्यासाठीं खालीं वाकत असलेल्या सुलभाला म्हणाले, "अरे वा सुलभा, तुझ्या यजमानांना घेऊन तूं आमच्याकडे इतक्या लवकर येशील अशी मुळींच अपेक्षा नव्हती हं! नवीन लग्न झालेल्या लोकांना दुसऱ्याकडे चहा फराळास जाऊन चहाफराळाची चव घ्यायला फुरसतच कुठें असते !

"असं काय हो काका ? तुम्ही दुसरे कोणी वाटतं ?" सुलभानें नाराजी व्यक्त करीत म्हटलें, "किती आपलेपणानें नि हक्कानें आलो आम्ही दोघं तुमच्याकडे ! होय कीं नाहीं हो ?"

"अं—होय. बाबासाहेब म्हणाले जाऊन या–"

"अस्सं ! म्हणजे सुलभा, मूळ कल्पना कांहीं तुझी दिसत नाहीं जावईबापूंच्या म्हणण्याप्रमाणें !"

"नाहीं. तसं नव्हे. ही पण म्हणतच होती जाऊं जाऊं म्हणून" विद्याधरानें सुलभाची बाजू घेतली.

"किनई काका, बाबा म्हणाले खरेकाकांचा सल्ला घ्या–"

खरेकाका मोकळेपणानें हंसले नि म्हणाले, "बाबासाहेबांचा स्वभाव अजून बदललेला दिसत नाहीं, जावई आले तरी ! When



अनुक्रमणिका

**खरे काकांनीं त्या वर्षानुवर्षं बंद असलेल्या खोलीचे दार उघडलं.**

**— आणि आम्हांला आमच्या 'केस'चं उत्तर मिळालं. त्यांनीं न सांगतांच !!**

● ● ● ● ● ●

in difficulty play the trump" या वचनाप्रमाणें कांहीं विवाद्य मुद्दा उपस्थित झाला, अडचण भासली कीं, संबंधित व्यक्तीला मजकडे पाठवून द्यायची संवय गेली नाहीं बाबासाहेबांची."

"मग काय चुकलं हो त्यांचं ?"—सुलभानें विचारलें.

'पोरी, तूं तर माझ्याशींच भांडायला लागलीस. मग तुमचा तंटा कसा सोडवणार मी?" खरेकाकांनीं विचारलें व जरा आवाज चढवून प्रमिलाकाकूंना हांक मारली. "सुलभा आलीय हं जावई बापूंना घेऊन. चहापाण्याची व्यवस्था करायला हवी कांहीं !"

काकू लगबगीनें दिवाणखान्यांत आल्या. "अगबाई, केळकरांची सुलू कां आलीय ! मला आधींच कां नाहीं हाक मारलात?"

"काकू, नमस्कार करते हो!" सुलभा नमस्कार करूं लागली.

"अष्टपुत्रा सौभाग्यवती भव !" काकूंनीं मनःपूर्वक आशीर्वाद देत म्हटलें, "पुढच्या वर्षी बारशाला बोलावणं हवं हो !"

"इश्य, आजच्या विसाव्या शतकांत हा कुठला आशीर्वाद काकू ?"—सुलभानें नापसंती व्यक्त केली.

"कांहीं वाईट नाहीं तसा आशीर्वाद. मुळींच मुलं नसण्यापेक्षां–" विद्याधरनें जीभ चावली. खरे कुटुंबाला मूलबाळ नव्हतें हें त्याच्या लक्षांत आलें.

खरेकाकांनीं मात्र त्याच्या चावलेल्या जिभेकडे दुर्लक्ष केलें व किंचित् हंसून म्हटलें, "अच्छा, म्हणजे तुमच्या भांडणाचा हाच विषय दिसतोय बहुधा. बालराजांचं आगमन केव्हां व्हावं ह्याबद्दल दुमत झालेलं दिसतंय !...बरं कां हो सुलभाच्या काकू, आज सल्ला विचारायला आलीं आहेत हीं दोघं माझा !"

"छान. मग मी आपली आंत जाते कशी. चहाबरोबर कांद्याची थालिपीठेंही लावते चांगली खमंग. सुलूला फार आवडतात." काकू आंत निघून गेल्या.

आपल्या समोरच्या कोचावर दोघांना बसायला लावून स्वतः आरामखुर्चीचा आश्रय घेत खरेकाका म्हणाले, "हं. बोला !"

"काका, मी म्हणतो—"

"काका, मी सांगते—"

"हे बघा. काका आहेत एकच तेव्हां एकावेळीं एकानं बोललेलं जास्त बरं." काकांनीं सुचवलं.

"सांगा तुम्हीच. एकदां मला नांव ठेवल्याचे समाधान मिळूं दे !"—सुलभा म्हणाली.

## वसंत गांगल

"छे छे ! तूंच सांग आपली. नाहींतर म्हणशील मी पहिल्यांदा बोललो म्हणून माझ्या बोलण्याचा काकांच्या मनावर परिणाम होऊन माझीच बाजू त्यांनीं घेतली म्हणून." विद्याधर म्हणाला.

"काका कांहीं इतके हे नाहींत कांहीं." सुलभा म्हणाली, पण मीच सांगते... बरं कां काका ! आम्हीं दोघंहि नोकरी करतो."

"हो ठाऊक आहे मला !" काकांनीं सांगितलें.

"समजा, आम्हाला इतक्यांतच मूल झालं, तर नोकरी सोडावी लागेल मला ! कारण मुलाची आबाळ करून नोकरी करणं मला पसंत नाहीं, नि ह्यांचंहि तेंच मत आहे.

"कांहीं वाईट मत नाहीं त्यांचं नि तुझंहि !" काकांनीं पसंती व्यक्त केली.

"पण मी नोकरी सोडली तर—"

"तर काय होणार आहे ग, मी म्हणतो ! मला अगदीं लठ्ठ चांगल्या पगाराची नोकरी नसली, चार आकडी पगार मी दरमहा घरांत आणत नसलो तरी बायकापोरांचं व्यवस्थित पालनपोषण करण्याची धमक नाहीं कीं काय माझ्यामध्यें?" विद्याधर म्हणाला.

"मला वाटतं, माझ्या जन्माला येणाऱ्या बाळानं मोकळ्या, स्वतंत्र आणि सर्व सुखसोयींनीं युक्त अशा जागेंत राहावं. त्याची सर्वांगीण वाढ होण्यासाठीं आवश्यक असलेल्या गोष्टींत हवा तेवढा पैसा खर्च करावयास आम्हाला दिक्कत वाटूं नये."

"हं !" काका म्हणाले.

" पण हें सारं स्वप्न पुरं व्हायला कितीतरी वेळ लागेल !"—विद्याधर.

"फार नाहीं. फक्त १० वर्षं. आतां ह्यांना मिळणारा पगार दोघांचं व्यवस्थित भागूनहि थोडीफार बचत होऊं शकेल इतका आहेच. माझा पगार सर्वच शिल्लक राहील. दहा वर्षांत तुमच्या सारखं छानदार घर बांधून मग संसार वाढवावा असं म्हणतेय मी. काय हरकत आहे हो काका?"

"काका, मला नाहीं वाटत तेवढ्या अवधींत हें हिचं घरं बांधून होईलसें. पहिली गोष्ट, माझी एवढीं दहा वर्षे थांबायची मुळींच तयारी नाहीं. आणि या अवधींत दुसरे कांहीं अडथळें. अचानक उपस्थित होणारे खर्च कशावरून येणार नाहींत ? वाढती महागाई लक्षांत घेतां—"

"पण ती लक्षांत घेऊनचं अंदाज बांधलाय मी!"

"पण वय होतंऽऽ—"

"आणखी दहा वर्षांनीं मी फक्त ३१ वर्षांची होईन, नि तुम्ही ३३; या वयांत कांहीं स्त्रियांचीं लग्न सुद्धां होत नाहींत."

यांचा हा वादविवाद किती लांबला असता कोण जाणें. पण एकदम आठवल्यासारखें करून खरेकाका म्हणाले, "खरंच जावईबापू, तुम्हीं आमच्या छानदार घराचं वर्णन सुलभाकडून बरंच ऐकलं असणार, पण अजून पाहिलं नाहींत सर्व. चला घर दाखवितो."

सुलभा नि विद्याधरला घेऊन ते घर दाखवायला निघाले. पुढील अंगणांतील फुलझाडें नि मागील परसदारांतील फळझाडें व भाजीपाला दाखवून त्यांनीं घरां-







अनुक्रमणिका

तील इतर खोल्या दाखविण्यास सुरुवात केली. अद्ययावत् सुखसोयींनीं भरलेलं स्वयंपाकघर विद्याधरानें पाहातांच सुलभा म्हणाली, "अगदीं असं स्वयंपाकघर असावं आपलं असं नाहीं वाटत तुम्हाला ?" त्यानंतर जेवणघर, कोठीघर माजघर, बेडरूम, पाहुण्यांसाठींच्या खास खोल्या हें सारं पाहातांच विद्याधरला देखील वाटलें कीं, खरोखरच या घरांत कोठें–कोठें कांहीं कमतरता नव्हती. प्रत्येक खोलीच्या उपयुक्ततेप्रमाणें तिची रचना होती ! तिच्यांतील फर्निचर, पडदे इतर सोयी सर्वांत समर्पकता व कलात्मकता होती. शेवटीं एका बंद दारापुढें येऊन तिघेंहि उभे राहिले. मी किल्ली घेऊन येतो असें सांगून खरेकाका किल्ली आणावयास जातांच सुलभानें विद्याधरला माहिती पुरविण्यास सुरुवात केली.

सुलभाचं लहानपणापासून खरेकाकांकडे येणं जाणं होतं. एवढंच नव्हे तर खरेकाकांची ती फार आवडती होती; पण आजपर्यंत तिला सुद्धां बंद दाराच्या आंतील खोलीचें दर्शन घडलें नव्हतें. लहानपणीं तर तिला त्या खोलीविषयीं किती कुतूहल होतें. परिकथा ऐकण्याच्या वयांत तिला वाटे येथें जादूचा घोडा तर नसेल ना? कीं गुप्त भुयाराचं दार असावं आंत ? एखादं भूत तर दडून बसलं नव्हतं ना त्यांत ?"–एक ना दोन अनेक कल्पना तिच्या मनांत येत. अनेक तऱ्हांनीं तिनं काकांना खोली उघडून दाखविण्याची गळ घातली होती. पण काकांनीं कधीं तिचं ऐकलं नव्हतं. पण लग्न झाल्यावर आज पहिल्यांदाच खरेकाकांकडे येतांच जावईबापूंना मात्र खोली पाहाण्याचें भाग्य लाभलें होतें.

खरे काका आले. त्यांनीं किल्ली लावून दार उघडलें नि अधिऱ्या कुतूहलानें ती दोघं झट्कन आंत शिरलीं. "किती छान !" असे सहजस्फूर्त उद्गार दोघांच्याहि तोंडांतून बाहेर पडले. खास मुलांसाठीं तयार केलेली खोली होती ती. पाळणा, बाबागाडी, लाकडी घोडा, सायकल. . . लहान मुलाचं लहानपण सुखकर होण्यासाठीं लागणारी सारी बाह्य साधनं तिथं होती. भिंती रंगवितांना सुद्धां त्या लहान मुलांना आवडतील अशी काळजी घेतली होती. एका बाजूच्या भिंतीवर तर पशुपक्ष्यांचीं चित्रेंच काढलेलीं होती. . . . . . खोली अतिशय स्वच्छ होती. कोणाचा तरी प्रेमळ हात रोज तिची साफसफाई करीत असावा.

पण, पण त्या खोलीनं अजूनहि कोणा-लहान मुलाच्या रडण्या हंसण्याचा आवाज ऐकला नव्हता, तेथील पाळणा अजून हलला नव्हता आतां हलेलशी शक्यता नव्हती.

दोघांनीं एकमेकांकडे पाहिले व काकांकडे पाहाण्यासाठीं दोघं वळले. पण काका तेथून निघून गेले होते. आतां त्या खोलींत थांबावंसं दोघांनाहि वाटेना. खोलीचं दार हळूच बंद करून तिला कुलूप लावून किल्ली घेऊन विद्याधर नि सुलभा हॉलमध्यें आलीं.

खरेकाका तिथं आपल्या आवडत्या आरामखुर्चीवर बसले होते; त्यांना वाटलं असलंच तर तें चेहेऱ्यावर दाखविलें जात नव्हतें.

"आवडलं कां घर ?"

"हो. खूप !" विद्याधर म्हणाला.

"नि मुलांची खोली ?"

"फारच छान आहे."—विद्याधर.

"अश्शीच, अगदीं अश्शीच खोली माझ्या-घरांत बांधणार आहे मी."—सुलभा.

"मी सुद्धां अगदीं हेंच शब्द खूप वर्षांपूर्वी बोललो होता !" काका म्हणाले आणि त्यांनीं शांतपणें, कांहींशा गंभीर आवाजांत सांगायला सुरुवात केली–

"तुझ्या काकूला मुलांची फार आवड. त्यामुळेंच ती घरांत पाळणा हलवायला फार उत्सुक होती. मला वाटे आपली गरिबी. गांठी पैसा आडका कांहीं नाहीं. मूल झालं लगोलग तर कोणी सांगावं त्यांची खायप्यायचीसुद्धां आबाळ व्हायची ! ! तसा मी एंजिनिअर होतो; घरं बांधायला शिकलो होतो. पण तें सर्व स्वतःच्या हुशारीवर स्कॉलरशीप मिळवून राहात होतो मात्र १०×१० च्या छोट्या जागेंत –ती सुद्धां काळोखी, पावसाळ्यांत ओल येणारी. पुढे नोकरी मिळवणं केवळ हुषारीवर अवलंबून नसतें. त्यासाठीं वशिले वगैरे लागतात हें ठिकठिकाणीं मिळालेल्या नकारघंटांनीं कळत होतें. धंदा सुरू करायचा तर भांडवलाची उणीव भासत होती. आज ना उद्यां ही परिस्थिति मी बदलूं शकेन असा आत्मविश्वास होता, पण तोंपर्यंत घरांत मूलबाळ नको असें ठरविलें होतें मी मनाशीं. स्वतःचं घर झाल्यावर संसार वाढविण्यास हरकत नाहीं असें माझें ठाम मत होतें. तें मी तुझ्या काकूच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न केला. तिच्या इच्छेविरुद्ध तिला नोकरी करावयास लावली—!"

"मग ?"—सुलभा.

"मग काय, १२ वर्षांनीं माझें स्वतःच्या घराचें स्वप्न प्रत्यक्षांत उतरलें. घर झालं. मुलांसाठीं खास खोली झाली. पण ती खोली बंदच राहिली."—काका.

"पण कां ! तुमचं कांहीं तसं वय झालं नव्हतं दोघांचंहि !"

"कोणास ठाऊक ! कदाचित् १२ वर्षें निसर्गाच्या विरुद्ध गेल्यानं त्यानं सूड उगवला असावा !"—खरेकाका म्हणाले !

"डॉक्टरांचा सल्ला घेतला होता–?" विद्याधरानें हळूच विचारले.

"हो त्यासाठीं खर्च करायला आतां आमच्याजवळ भरपूर पैसा होता ! डॉक्टरांनीं सांगितलं कीं आमच्या दोघांत कोणताच दोष नव्हता–पण तरीहि आम्हाला मूल झालं नाहीं !"

"कां !"

"होतं म्हणे असं कधीतरी !" असं डॉक्टरांनीं सांगितलें !"

इतक्यांत काकू चहा फराळाच्या बशा घेऊन बाहेर आलेल्या पाहातांच तिघंहि गप्प झालीं. थालिपिठाच्या बशा एकेकांच्या हातीं देत काकूंनीं विचारलं– "झाली कां सल्ला मसलत?"

"होऽऽ"—सुलभानें चटकन् म्हटलें.

"नाहीं तर मी म्हणत होतें राहा आजच्या दिवस इथंच !"

"नको काकू ! आज आतां घरींच जातो काकू ! पुन्हां कधीं तरी–"

"पण निष्कर्ष काय निघाला तें नाही सांगितलंस !"

"मग सांगतील तुम्हाला काका सगळं. पण माझंच चुकत होतं खरं !"—सुलभा म्हणाली.

●●●

**तुमच्या (वि)श्वासावर देशाचा प्राण अवलंबून आहे. तेथें तन, मन, धन वहायचे आहे !**








एकाची पॅण्ट, दुसऱ्याचा शर्ट, तिसऱ्याचे बूट घालून चार्ली चॅप्लिनच्या वेषांत ओल्डफील्ड क्रीडांगणावर दाखल झाला. आणि यष्टीला चिकटून उभा राहिला.

"ग्रेगरी वेगवान गोलंदाज आहे. मागें उभा रहा" कॅप्टन कोलिन्स ओरडला.

—त्या पहिल्या सामन्यांतच हा 'चॅपलिन' क्रिकेटचा 'हीरो' झाला.



# य ष्टी मा गी ल जा दू गा र

—शिरीष कणेकर

**क्रिकेटमध्ये** सर्वोत्कृष्ट यष्टिरक्षक कोण होऊन गेला?– हा प्रश्न तुम्ही विचारायचा अवकाश कीं, खणखणीत आवाजांत उत्तर येईल, 'अर्थात्‌च गॉडफे इव्हान्स.' हा आवाज विरतो न विरतो तोंच दुसरीकडून तितक्याच जोरदार आवाजांत उत्तर येईल–'मुळींच नाहीं. आमचा डॉन टॅलनच सर्वश्रेष्ठ होता.' या दोन गगनभेदी आवाजांनीं तुमच्या कानाला दडे बसले नसतील तरच तुम्हाला कोणीतरी पुटपुटलेलं ऐकू येईल–'बर्टी ओल्डफील्डहि काहीं वाईट नव्हता.'

पहातांक्षणीं नजरेंत भरेल असे ओल्डफील्डमध्यें कांहींच नव्हते. ना भरपूर उंची, ना प्रभावी व्यक्तिमत्व! त्याचे लुसलुशीत हात इतक्या वर्षांच्या यष्टिरक्षणाची ग्वाही मुळींच देत नसत; ते तर एखाद्या निष्णात पियानोवादकासारखे वाटत. क्षेत्ररक्षणास बाहेर पडणाऱ्या ऑस्ट्रेलियन संघातील ग्रेगरी, मॅक्डोनल्ड, आर्मस्ट्रॉंग यासारख्या भीमकाय खेळाडूंत पांच फूट पांच इंच उंचीची ओल्डफील्डची वामन मूर्ति दडून जात असे. त्याचं अस्तित्व सर्वसामान्य प्रेक्षकांच्या लक्षांत देखील येत नसे. खेळ सुरू झाल्यावर प्रेक्षकांचे लक्ष वेधून घेण्याचा प्रयत्न ओल्डफील्ड कधींहि करीत नसे. ते त्याच्या रक्तातच नव्हते. भपका कसा तो त्याला ठाऊकच नव्हता. त्याच्या यष्टिरक्षणांत देखावा, डौल यांचा संपूर्णपणे अभाव होता. होता तो निटनिटकेपणा, सावधपणा, सफाईदारपणा! मधूनच तो एखादा लेग-साईडचा झेल शिताफीनें पकडे किंवा फलंदाजाला बेसावध गाठून चटकन बेल्स उडवी. ऑस्ट्रेलियन खेळाडूंचा त्याच्याभोवती गराडा पडे, त्याच्यावर अभिनंदनाचा वर्षाव होई. अशावेळीं त्याचे निळे डोळे आनंदाने हंसत, त्याचे गोबरे गाल हंसत; त्याचे सारे शरीर हंसे–अगदीं एखाद्या बालकाप्रमाणें. आणि मग प्रेक्षक त्याच्या कर्तृत्वानें भारावून जात. त्यांना तो आहे त्यापेक्षां कितीतरी उंच वाटे, कितीतरी आडदांड वाटे.

त्याच्या यष्टिरक्षणांत इव्हान्सचा रुबाब नव्हता कीं, डकवर्थचा आक्रस्ताळीपणा नव्हता, त्याचे 'अपील' जेमतेम अंपायरला ऐकू जावयाचे. इव्हान्सचे अपील म्हणजे त्याची विजयपताका असे–"काय कसे विटिचीत केलय्‌ लेकाच्याला! झकास नं? इव्हान्स म्हणजे काय समजलांत तुम्हीं!"

डकवर्थचे 'अपील' हे 'अपील' नसायचेच मुळीं. तो निर्णयच असायचा. फलंदाजाच्या चुकीची त्याला दिलेली ती सजा असायची. त्याला जणूं म्हणायचं असायचं–"आऊट! आऊट! मी सांगतो आऊट आहे. मी इथें धडधडीत जिवंत असतांना क्रीज सोडून पुढें जातोस याचा अर्थ काय? अंपायरकडे पहायची जरूर नाहीं. मी सांगतो तूं आऊट आहेस आऊट! आऊट!" ओल्डफील्डचे 'अपील' अगदींच वेगळ्या प्रकारचे असायचे. तो म्हणायचा 'हाऊ इज दॅट' पण त्याचा आवाज आणि चेहरा कांहीं वेगळंच दाखवायचा, तो जणू फलंदाजाची क्षमायाचनाच करायचा. जणु त्याला म्हणायचं असायचं–"माफ कर हं! असलं कृष्णकृत्य आणि तेही तुझ्या पाठीमागें करणं मला बिलकुल शोभलं नाहीं. पण काय करणार रे, धंदाच पडला तसा. बरं, भेटूच आपण नंतर. आणि हो! जरा संभाळून जा हो. नाहीं पॅव्हिलियनच्या पायऱ्या निसरड्या झाल्यात म्हणून म्हटलं."

## हिरा सांपडला

बर्ट ओल्डफील्ड उदयाला कसा आला याची कहाणी फार मनोरंजक आहे. एका रात्रींत तारकापदाला पोहोचणाऱ्या नटी-प्रमाणें तो एका दिवसांत उत्कृष्ट यष्टिरक्षकाच्या पदाला पोहोचला. त्याचं असं झालं:– १९१९ सालची गोष्ट. हार्बी कोलिन्सच्या नेतृत्वाखालीं ऑस्ट्रेलियन इंपिरिअल फोर्सेसचा संघ इंग्लंडमध्यें खेळत होता. संघाचा एकमेव यष्टिरक्षक टेड लाँग जेव्हां आजारी पडला तेव्हां कोलिन्सपुढें काय करावे हा मोठा प्रश्न पडला. एक तरुण ऑस्ट्रेलियन पोऱ्या बऱ्यापैकीं यष्टिरक्षण करतो असें कळल्यावर कोलिन्स त्याच्या शोधार्थ बाहेर पडला. एका राहुटींत लष्करी गणवेशांत पत्र लिहित बसलेला तो तरुण–बर्ट ओल्डफील्ड कोलिन्सला सांपडला.

"तूं यष्टिरक्षण करतोस म्हणे !" आपली ओळख करून देण्याच्या भानगडीत न पडता कोलिन्सनें मुद्याला हात घातला. "तुझ्यापाशीं क्रिकेटचा वेष आहे कां? नसल्यास गोळा करायच्या मार्गाला लाग. उद्या ऑस्ट्रेलियन संघात येऊन दाखल हो!" ओल्डफील्डच्या होकाराची वाट न पहातां कोलिन्स निघून गेला. ओल्डफील्डचे नांव विचारून घेण्याचीसुद्धां त्याला आवश्यकता भासली नाहीं. कशाला विचारायचे नांव आणि गांव! लॉंग बरा होईपर्यंत कोणीतरी पाहिजे म्हणून ह्याला घ्यायचं.

दुसऱ्या दिवशीं एकाची पॅंट, दुसऱ्याचा शर्ट तर तिसऱ्याच बूट अशा चार्ली चॅप्लीनच्या अवतारांत ओल्डफील्डची स्वारी येऊन दाखल झाली तेव्हां ऑस्ट्रेलियन खेळाडूंनीं मोठ्या मुश्किलीनें हसूं आवरले. सामना सुरू झाला. लांबलचक 'स्टार्ट' घेऊन चेंडूफेक करण्यास ग्रेगरी सज्ज झाला. कोलिन्सनें क्षेत्ररक्षकांवरून एकवार नजर फिरविली अन् तो थबकला. नवा यष्टिरक्षक यष्टीच्या अगदीं जवळ खेटून उभा होता. कोलिन्सनें त्याला हटकले,

"अरे बाबा, ग्रेगरी वेगवान आहे. तूं मागे उभा रहा."

"जशी आपली इच्छा" असें विनयानें म्हणून ओल्डफील्ड दोन इंच मागे सरकला.

"मी तुला सांगतो तो चांगलाच वेगवान आहे. तूं मागे उभा रहा" कोलिन्स जवळजवळ ओरडला.

"जशी आपली इच्छा" ओल्डफील्ड आणखी बरोबर दोनच इंच मागे सरकला.

कोलिन्स चरफडतच आपल्या जागेवर जाऊन उभा राहिला– "सरळ हॉस्पिटलांत जाऊन पोहोचेल तेव्हां समजेल. फार शहाणा समजतोय् स्वतःला !"

खेळ सुरू झाला. ग्रेगरीच्या तिसऱ्या षट्कांत फलंदाजानें चेंडू ग्लाइड केला. ओल्डफील्ड विजेच्या चापल्यानें डावीकडे झेपावला आणि जमिनीपासून कांहीं इंचावर त्यानें शिताफीनें डाव्या हातानें चेंडू पकडला. ऑस्ट्रेलियन खेळाडूंनीं मनःपूर्वक ओल्डफील्डचें अभिनंदन केलें. चमत्कारिक नजरेनें ओल्डफील्डकडे पहात ग्रेगरीनें त्याची पाठ थोपटली. कोलिन्स मात्र आपल्या जागेवरून हलला नाहीं. त्याच्या मनातील ओल्डफील्डबद्दलची अढी पूर्णतः गेली नव्हती. पुन्हां सर्व स्थिरस्थावर झालें. षट्कें टाकली जात होती. धावा काढल्या जात होत्या. ग्रेगरीचा एक वेगवान चेंडू खेळण्यासाठीं फलंदाज पुढें आला. चेंडू त्याच्या बॅटीतून हुकला. चेंडू अडवून निमिषार्धांत ओल्डफील्डनें बेल्स उडविल्या. अंपायरचा हात केव्हांच वर झाला होता. ऑस्ट्रेलियन खेळाडू थक्क झाले. ग्रेगरीच्या गोलंदाजीवर 'स्टंपिंग' करण्याची कल्पनाच त्यांना स्वप्नवत वाटत होती. क्षणभर सारे स्तब्ध राहिले. दुसऱ्याच क्षणीं ओल्डफील्डकडे धावले. पहिला धावला कर्णधार हार्बी कोलीन्स.

"कमाल केलीस तूं! कमाल केलीस तूं!" धापा टाकीत कोलीन्स म्हणाला. त्याला पुढें कांहीं बोलायला सुचेना.

एवढ्यांत कोणीतरी म्हणाले, "हे पहा, आतां तू कुठेहि उभा रहा. तू विकेटच्या पुढें उभा राहिलास तरी तुला कोणी विचारणार नाहीं."

"आणि तुझं नांव काय ?" आपण त्याचें नांव अद्याप विचारलेले नाहीं हे कोलिन्सच्या आत्ता लक्षांत आले.

या अनपेक्षित स्तुतीनें आणि शाबासकीनें बापडा ओल्डफील्ड भारावून गेला, बावरून गेला. एखाद्या मुलीसारखा तो चक्क लाजला तेव्हां तर हास्याचा स्फोट झाला.

१९२०–२१ च्या इंग्लंड-ऑस्ट्रेलिया कसोटीमालिकेंत पहिल्या तीन सामन्यांत ओल्डफील्डचा समावेश करण्यांत आला आणि लौकरच सॅमी कार्टरची जागा त्यानें घेतली. त्यानंतर १९३७ सालापर्यंत म्हणजे जवळजवळ सोळा सतरा वर्षे ओल्डफील्ड ऑस्ट्रेलियन संघाचा अविभाज्य घटक होता. स्ट्रडविक, एम्स, इव्हान्स, कार्टर, टॅलन, लॅंगले यासारखे उत्कृष्ट यष्टिरक्षक पाहिल्यावरसुद्धां ओल्डफिल्ड हा सर्वश्रेष्ठ होता हे हार्बी कोलिन्सचे मत कायम आहे.

ओल्डफील्ड एकूण ५६ कसोटी सामन्यात खेळला. त्यांत त्यानें ८२ खेळाडूंना झेलबाद केले; तर ५३ जणांना विटीचीत (Stumped) केले. एकूण १३५ विकेट्स त्याच्या खात्यावर जमा आहेत. प्रथम दर्जाच्या क्रिकेटमध्यें त्यानें ६३० विकेटस् (३७८ झेलबाद व २५२ विटीचीत) काढल्या. व ५६६२ धावा काढल्या. त्यांत सहा शतकें आहेत. इंग्लंडविरुद्ध- ओल्डफील्ड एकूण ३८ सामने खेळला. त्यांत त्याने ५९ फलंदाज झेलबाद केले तर ३१ विटीचीत केले. या ३८ कसोटी सामन्यांत इंग्लिश फलंदाजांनीं २०,७१४ धावा फटकाविल्या. पैकीं ओल्डफील्डनें दिलेल्या बाइज आहेत ३०२. म्हणजे दर ६८.६ धावांच्या मागे त्याने फक्त १ बाय दिली. हे आंकडे त्याच्या यष्टिरक्षणांतील कौशल्याचे प्रतीक आहेत.

## असाधारण कौशल्य

यष्टिरक्षकाची किंमत तो ज्या दर्जाच्या गोलंदाजीवर यष्टिरक्षण करतो तिच्यावरून करण्यांत येते. गोलंदाज जितके कसबी, हरहुन्नरी आणि श्रेष्ठ तितकाच असल्या

दर्जेदार गोलंदाजीवर यष्टिरक्षण करून यश मिळविणारा यष्टिरक्षक श्रेष्ठ. सामान्य गोलंदाजीवर सामान्य प्रतीचा यष्टिरक्षक चालून जातो पण फसवी गोलंदाज क्षणार्धात त्याचे पितळ उघडे पाडतो. रवीशंकरच्या सतारीला तुबल्यावर अल्लारखाँच पाहिजेत, येरा गबाळ्याचे काम नाहीं ते. बर्ट ओल्डफील्डने जितक्या उत्कृष्ट आणि विविध प्रकारच्या गोलंदाजीवर यष्टिरक्षण केले तितक्या उत्कृष्ट गोलंदाजांच्या संचावर जगांतील दुसऱ्या कोणत्याहि यष्टिरक्षकानें यष्टिरक्षणाची कामगिरी बजावली नसेल. मॅक्डोनल्ड, ग्रेगरी आणि मॅकॉर्मिक यासारखे द्रुतगति गोलंदाज व ओरेली, मेली, ग्रिमेट, फ्लिटवुडस्मिथ आणि मॅकार्टने यासारखे फिरकी गोलंदाज ओल्डफील्डनें आपल्या सतरा वर्षांच्या दीर्घ कारकीर्दीत हाताळले. मॅक्डोनल्डचे स्वींगर्स तो जितक्या लीलेनें आडवी त्याच लीलेनें ग्रेगरीचे वेडेवाकडे उडणारे चेंडू, बीमर्स व बंपर्स आडवी. मेलीचा गुगली, ग्रिमेटचा 'फ्लिपर', ओरेलीचा लेगब्रेक, मॅकार्टनेचा टॉप-स्पिनर आणि फ्लिटवुड-स्मिथचा 'चायनामन' फलंदाजाला हमखास चकवा देई, घोटाळ्यांत पाडे पण ओल्डफील्डला चकविणें त्याला शक्य होत नसे. चेंडू उजव्या यष्टिबाहेर असो किंवा डाव्या यष्टिबाहेर असो, वेगवान असो, मध्यमगति असो किंवा मंदगती असो, लेगब्रेक असो किंवा ऑफ ब्रेक असो ओल्डफील्ड तो सारख्याच सफाईनें आडवी व स्लिपमार्फत गोलंदाजाकडे परत पाठवी. अव्याहतपणें, तासन् तास, न दमता न कंटाळता आणि न कुरकुरता आपले काम तो चोखपणें बजावीत असे. ओल्डफील्डची ही कर्तव्यदक्षता गोलंदाजाला अत्यंत उपकारकारक ठरत असे. गोलंदाजाला एक प्रकारचा विश्वास वाटे. ओल्डफील्ड म्हणजे गोलंदाजाला लाभलेले टॉनिक होते. आर्थर मेली म्हणतो,

"स्लिप्समध्यें ग्रेगरी आणि यष्टिमागें ओल्डफील्ड माझ्या गोलंदाजीवर नसता तर कसोटी सामन्यांत जागा टिकविणें मला शक्य झाले नसते.

चार्लस् मॅकार्टने म्हणतो,

"फलंदाजाला नव्र्हस न करतां गोलंदाजाला सर्वतोपरी प्रोत्साहन देण्याची कला ओल्डफील्डला चांगली साधली होती."

क्रिकेट जगांत आज ज्याच्या शब्दाला फार किंमत आहे असे जाणकार दर्दी ओल्डफील्डविषयीं काय म्हणतात पहा—

हार्वी कोलिन्स:—इंग्लंडच्या कुंद वातावरणांत दमट आणि ओलसर हिरवळीवर १९२६ ते १९३४ च्या दरम्यान ओल्डफिल्डनें जे यष्टिरक्षण केले त्याच्या तोडीचे यष्टिरक्षण माझ्या तरी पहाण्यांत नाहीं.

नेव्हिल कार्डस्:—फलंदाजाच्या प्रत्येक बारीक सारीक हालचालीवर नजर ठेवून असलेला ओल्डफील्ड उंदराच्या हालचालीवर डोळा ठेवून दबा धरून टपून बसलेल्या मांजरासारखा भासायचा. फलंदाजानें जरा चूक करायची खोटी की ओल्डफील्डनें त्याला गट्टम केलंच !

जॉनी मॉईस:—निटनिटकेपणा, ठाकठीकपणा, सहजता, सफाई यांत ओल्डफील्डला मागे सारेल असा यष्टिरक्षक झाला नाहीं.

---

एम. डी. लॉइझ (सॉमरसेटचा कर्णधार व यष्टिरक्षक) —माझ्या सबंध क्रिकेटजीवनांत मी ओल्डफील्डच्या तोडीचा यष्टिरक्षक पाहिला नाहीं.

सर पेलहॅम वॉर्नर:—ओल्डफील्ड सर्वोत्कृष्ट होता कीं नाहीं हे मी सांगू शकत नाहीं पण एवढं मात्र मी सांगतो कीं, माझ्या पहाण्यातल्या दुसऱ्या कुठल्याहि यष्टिरक्षकापेक्षां कुठल्याहि बाबतींत तो कमी भरला नसता.

डेंझिल बॅचलर:—जो झेल इव्हान्स वेडेवाकडे सूर मारून, गडबडा लोळून घेतो तो झेल ओल्डफील्ड घेऊ शकेल काय? नक्कीच घेईल. पण इतक्या सहजतेनें कीं तो झेल अत्यंत अवघड होता हे सामान्य प्रेक्षकाच्या लक्षांत देखील येणार नाहीं.

## लारवुडला वांचविले

ओल्डफील्ड क्रिकेटच्या साधनांच्या बाबतींत चोखंदळ होता. नेहमीं चांगल्या दर्जाची, चांगल्या स्थितींतील साधनें वापरण्याकडे त्याचा कटाक्ष होता. हाताच्या बोटांच्या पहिल्या पेराभोवती तो एक टेप गुंडाळीत असे. नंतर हरणाच्या कातड्यापासून तयार केलेल्या हातमोज्यांच्या दोन जोड्या तो एकावर एक घालीत असे. तत्पूर्वी ओल्डफील्ड ते हातमोजे पाण्यांत भिजवून घेत असे. नंतर प्रत्येक बोटावर तो कातडी टोपणें बसवीत असे. या टोपणांना आतून रबर लावलेले असे. त्याचे ग्लोव्हज उत्तम प्रकारचे लवचीक असे असत. मॅक्डोनल्ड-ग्रेगरी यांच्यासारख्यांची गोलंदाजी थोपवायची म्हणजे एवढी काळजी घेणें अपरिहार्यच होते. पण एवढी काळजी घेऊन देखील त्याला कांहीं प्रसंगीं जबरदस्त दुखापती झाल्या. बोटें मोडणें ही नित्याची बाब होती. हेंड्रीचा एक वेगवान चेंडू अडवितांना त्याच्या उजव्या हाताचे मधले बोट मोडले. चारच दिवसांनीं तो कसोटी सामन्यांत खेळला. कुठलीहि दुखापत त्याला फार काळ क्रिकेटपासून दूर ठेऊ शकली नाहीं. १९२१ सालीं मॅक्डोनल्डच्या चेंडूनें जखमी झाल्यावर देखील तो तसाच खेळला. १९३३ सालीं मात्र त्याला गंभीर दुखापत झाली पण यष्टिरक्षण करतांना नव्हे तर फलंदाजी करतांना. लारवुडचा एक अत्यंत वेगवान चेंडू तोंडावर लागून तो रक्तबंबाळ झाला. त्याला निवृत्त व्हावे लागले. लारवुडच्या जीवघेण्या शरीरवेधी (bodyline) गोलंदाजीने प्रेक्षक अगोदरच प्रक्षुब्ध झाले होते. ओल्डफील्डच्या दुखापतीनें आगीत तेल पडल्यासारखे झाले. प्रेक्षक लारवुडला मारायला उठले. वृत्तपत्रांनीं 'ओल्डफील्ड प्रकरण' तिखटमीठ लावून रंगविले. त्यामुळें अत्यंत तंग परिस्थिती निर्माण झाली. यांतून मार्ग काढला खुद्द ओल्डफील्डनेच. "मला झालेल्या जखमेत माझ्याच चुकीचा भाग जास्त होता. लारवुडचा त्यांत कांहीं एक दोष नाहीं" असे स्पष्ट जाहीर करून ओल्डफील्डनें वातावरण निवळविले.

ओल्डफील्डच्या दिलदार स्वभावाचा हा मनोहर आविष्कार होता.

## हॉब्ज चीत झाला

२५ सालीं त्यानें आपल्या कौशल्याची परमावधि केली. त्याचे यष्टिरक्षण सफाईदार होतं, अचूक होतं, निर्दोष होतं. मेलबोर्नच्या फास्ट हिरवळीवर रायडरच्या गोलंदाजीवर पुढे उभं राहून त्यानें जॅक हॉब्जचा ६६ धांवावर लेगसाईडला अत्यंत अवघड झेल घेतला. दुसऱ्या डावांत हॉब्जनें भोपळा फोडण्यापूर्वींच ओल्डफील्डनें त्याला तंबूत परत पाठविले.

सिडने येथें ओल्डफील्डनें त्या कसोटी मालिकेतला व आपल्या क्रिकेट जीवनातला सर्वोत्कृष्ट झेल घेतला. ४८ सालीं इव्हान्सनें लेकरच्या चेंडूवर घेतलेला वार्न्सचा झेल, ४८ सालींच टॅलननें लिंडवालच्या गोलंदाजीवर पकडलेला हटनचा झेल आणि २५ सालीं ओल्डफील्डनें ग्रेगरीच्या चेंडूवर झेललेला हॉब्जचा झेल—हे तीन झेल क्रिकेटच्या इतिहासांत अमर झालेत.

ग्रेगरीच्या गोलंदाजीवर ओल्डफील्ड मागे उभा होता. ग्रेगरीच्या पहिल्याच षट्कांत सहाव्या चेंडूवर हॉब्जनें सुरेख ग्लान्स मारला आणि तो धाव घेण्यासाठीं धावला. चेंडू झेलला जाईल हे त्याच्या स्वप्नीहि नव्हते. ग्रेगरीच्या हातातून चेंडू सुटताच तो लेगस्टंपवर पडणार हे ओल्डफील्डनें हेरले. मिड-ऑफच्या दिशेनें वहाणाऱ्या वाऱ्यामुळें चेंडू लेगस्टंपच्याहि बाहेर जाईल हे चाणाक्ष ओल्डफील्डनें अचूक आणले. आणि म्हणूनच चेंडूचा टप्पा पडण्यापूर्वींच तो त्वरेनें डावीकडे वळला. हॉब्जच्या हालचालींवरून तो ग्लान्स मारण्याच्या बेतांत आहे हेहि त्यानें जाणलें व आणखी वेगानें डावीकडे वळला आणि हॉब्जनें फटका मारतांच विजेच्या चापल्यानें झेप घेऊन त्यानें डाव्या हातानें चेंडू पकडला.

हॉब्ज स्तंभित होऊन पहातच राहिला. त्या झेलाविषयीं बोलतांना तो म्हणाला, "माझ्या सबंध क्रिकेटजीवनांत इतका उत्कृष्ट झेल मी पाहिला नाहीं."

दुसऱ्या डावांत पुन्हा हॉब्ज ओल्डफील्डच्या लाजबाब यष्टिरक्षणामुळेंच बाद झाला. या वेळेला ग्रिमेटच्या चेंडूवर ओल्डफील्डनें त्याला यिटीचीत केले. ग्रिमेट आणि ओल्डफील्ड यांची जोडी चांगलीच जमली होती. विस्डेनची पानें उलटली तर झे. ओल्डफील्ड गो. ग्रिमेट किंवा यिटीचीत ओल्डफील्ड गो. ग्रिमेट हे समीकरण सर्रास आढळते. ओल्डफील्डच्या यशांत ग्रिमेटचा जितका वाटा होता त्याहून ग्रिमेटच्या यशांत ओल्डफील्डचा वाटा जास्त होता असं म्हटलं तर ती अतिशयोक्ति ठरू नये. ग्रिमेटच्या मारक लेग-ब्रेक्सइतकीच फलंदाजाला ओल्डफील्डची धास्ती वाटे. फलंदाजाला चकवून क्रिजच्या पुढे खेचण्याचे काम ग्रिमेटचे तर पुढचे काम असे ओल्डफील्डचे. ग्रिमेटच्या गोलंदाजाला तोंड देतांना ओल्डफील्डचे यष्टीमागील अस्तित्व सतत फलंदाजाला भेडसावीत असे. आणि यातच त्याच्या यशाचे गमक होते.

ओल्डफील्डनंतर जगांत कित्येक उत्तम यष्टिरक्षक झाले. खुद्द ऑस्ट्रेलियांतहि टॅलन, लॅंगले, ग्रौट यासारखे पहिल्या प्रतीचे यष्टिरक्षक झाले. या सर्वांविषयीं योग्य तो आदर ठेवून म्हणावेसे वाटते कीं, विविध प्रकारच्या विकेटवर, विविध प्रकारच्या गोलंदाजीवर सतत १७ वर्षें अकृत्रिम सफाईनें यष्टिरक्षण करणारा ओल्डफील्डच सर्वश्रेष्ठ ठरावा.

पण ओल्डफील्डचे चाहते असं कधींच म्हणणार नाहींत. ते सुद्धां ओल्डफील्डसारखेच लाजरेबुजरे शांत वृत्तीचे आहेत. त्यांनासुद्धां जाहिरातबाजीचा मनापासून तिटकारा आहे.

आणि म्हणूनच क्रिकेटमध्यें सर्वोत्कृष्ट यष्टिरक्षक कोण होऊन गेला? प्रश्न तुम्ही विचारायचा अवकाश कीं, खणखणीत आवाजांत उत्तर येईल.

"अर्थातच् गॉडफ्रे इव्हान्स."

हा आवाज विरतो न विरतो तोंच दुसरीकडून तितक्याच जोरदार आवाजात उत्तर येईल—

"मुळींच नाहीं आमचा डॉन टॅलनच सर्वश्रेष्ठ होता."

या दोन गगनभेदी आवाजांनीं तुमच्या कानाला दडे बसले नसतील तरच तुम्हाला कोणीतरी पुटपुटलेलं ऐकू येईल—

"बर्टी ओल्डफील्डहि कांहीं वाईट नव्हता".

●●●

# जागतिक क्रिकेटला नवें वळण लावणारा

# कर्णधार वॉरेल

—प्रा. अविनाश केळकर

**जागतिक 'अकरां'ची निवड करायची झाली, तर ज्याचें नांव हे पहिल्या पांचांतच घ्यावें लागेल अशा श्रेष्ठ, अष्टपैलू खेळाडूचा, कुशल कप्तानाचा—फ्रँक वॉरेलच्या कार्यकर्तृत्वाचा हा मनोज्ञ परिचय.**

**—अशांची 'पदचिन्हें'च नवा इतिहास घडवूं शकतात हें पटवून देणारा !!**

**क्रिकेटच्या** खेळांत अनिश्चितपणा फार असतो. शतकावर शतके काढून धावांचे डोंगर रचणारे पट्टीचे फलंदाज कधीं कधीं पहिल्याच चेंडूला बाद होऊन प्रेक्षकांचा विरस करतात. तर अखेरच्या जोडीनेंहि आपलीं शतकें फलकावर झळकविल्याची उदाहरणें आढळतात. जी गोष्ट फलंदाजांची तीच गोलंदाजांची. या असल्या अनिश्चिततेमुळें आणि चमत्कारामुळेंच जगामध्यें सर्व खेळांत क्रिकेटला अफाट लोकप्रियता मिळाली. क्रिकेट हा सर्व खेळांचा राजा झाला.

पण १९६१ मध्यें ऑस्ट्रेलिया आणि वेस्ट इंडिज या दोन संघामध्यें ब्रिस्बेनला झालेल्या कसोटी सामन्यानें या चमत्कारावर अक्षरशः कळस चढविला. अद्भूत-चमत्कारच घडला म्हणाना. क्रिकेटच्या कसोटी सामन्याच्या इतिहासांत अशी घटना कधींच घडली नव्हती. इंग्लंडमध्यें लँकेशायरच्या काउंटी सामन्यांत असा चमत्कार पूर्वी एकदां घडल्याचें लियरी कॉन्स्टंटाइननें आपल्या एका पुस्तकांत नमूद करून ठेवले आहे. म्हणूनच मनांत येतें कीं, धन्य ते ब्रिस्बेनचे प्रेक्षक कीं, ज्यांना तो अविस्मरणीय सामना पाहण्याचें भाग्य मिळालें. धन्य ते खेळाडू कीं, ज्यांनीं अखेरच्या क्षणापर्यंत तो सामना प्राणपणाला लावून लढविला



### अगा नवल वर्तलें

त्या सामन्याची थोडक्यांत हकीकत अशी. १९६१ मध्यें ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर गेलेल्या वेस्ट इंडीज संघाचा ऑस्ट्रेलियाच्या बलाढ्य संघाबरोबर पहिलाच कसोटी सामना होता. वेस्ट इंडीजचा कप्तान फ्रँक वॉरेल यानें नाणें जिंकून फलंदाजी पत्करली. ४५३ धांवा काढल्या. त्याला उलट उत्तर म्हणून ऑस्ट्रेलियानें पहिल्या डावांत ५०५ धांवा काढल्या. वेस्ट इंडीजचा दुसरा डाव २८४ धावांत संपला. अखेरच्या दिवशीं ऑस्ट्रेलियाला विजयासाठीं ३१२ मिनिटांत २३३ धांवा काढणें आवश्यक होतें. रिची बेनॉनें वॉरेलचें हें आव्हान स्वीकारलें. पहिले पांच नाणावलेले फलंदाज बाद झाले असतांहि डेव्हिडसन व कर्णधार बेनॉ यांनीं धडाडीनें खेळून दिवस अखेर धांवा पूर्ण करीत आणल्या. ऑस्ट्रेलिया जिंकणार म्हणून सर्वांनाच खात्री वाटूं लागली. प्रेक्षकांनीं आपापल्या जागा सोडण्यास सुरुवात









अनुक्रमणिका



### लप्पटलेले शस्त्र घेऊनी

[पु. शि. रेग्यांच्या 'लंपट ओले वस्त्र होऊनी'-च्या वाचकांना ही 'तुरटी' आवडेल]

'लप्पटलेले शस्त्र घेऊनी
शब्द शब्द तासून घ्यावें
डुळडुळणाऱ्या काव्यावरतीं
तुरटी होऊन जरा फिरावें.

मनात भलते-सलते येतां
जालीम 'रेचक' तुजया द्यावें
पहांट होतां दारामागील
'डबडें' देऊनी तुज धाडावें.

केली. ऑस्ट्रेलियाची अखेरची जोडी मॅकिफ आणि क्लाइन खेळूं लागली. हॉलची अखेरची ओव्हर चालूं होती. आठ चेंडूंची ओव्हर हॉलला तब्बल पांच ते सहा मिनिटें एक ओव्हर संपवायला लागतात. घड्याळाचा कांटा सरकत होता. खेळाची वेळ संपत आल्यामुळें पंच आपल्या खिशांतील घड्याळाकडे पुन्हां पुन्हां लक्षपूर्वक पहात होते. हॉल प्रत्येक चेंडू प्राणपणाला लावून टाकीत होता. सहाव्या चेंडूला एक धांव मुष्किलीनें मिळाली. आतां एक धांव काढली कीं, विजयश्री ऑस्ट्रेलियाला माळ घालणार होती. अवघे दोन चेंडू अन् एक धांव ! क्लाइननें फटका मारला. आत्मविश्वासानें तो धांवूं लागला आणि चमत्कार घडला. सालोमननें तब्बल छत्तीस फुटावरून चेंडू अचूक यष्टीवरच फेंकला. यष्टिरक्षक अलेक्झांडरनें आनंदानें उडी मारली. सर्व खेळाडूंनीं सालोमनला धन्यवाद दिले. मॅकिफ् धांवचित झाला होता आणि सामना अखेरच्या क्षणीं समसमान (Tie) झाला होता. अखेरच्या षटकांत अवघा एक चेंडू फेंकण्याचें बाकी असतांना ! याला म्हणतात क्रिकेट !

## फ्रॅंक वॉरेल झिंदाबाद !

या सनसनाटी खेळाचें श्रेय उभयपक्षीं कप्तानाला द्यायला हवें. त्यांतहि बेनॉपेक्षां वॉरेललाच जास्त. त्यानें प्रथमपासूनच आक्रमक पवित्रा टाकला होता. त्याला क्रिकेट खेळायचें होतें. त्यांतला क्रीडानंद लुटायचा होता. त्यांतलें 'थ्रिल' अनुभवायचें होतें. क्रिकेटमधील जयापजयावर राष्ट्राची इभ्रत अवलंबून असते ही गोष्ट वेस्ट इंडीजच्या लियर कॉन्स्टन्टाइन प्रमाणेंच वॉरेललाहि मंजूर नाहीं. सामना हरल्यास पदरी नामुष्की येते हें वॉरेलला पटणारें नाहीं. त्याची बालपणापासून क्रिकेटकडे पाहण्याची वृत्तीच वेगळी. पदरचे पैसे खर्चून सामने पाहाण्यासाठीं आलेल्या असंख्य प्रेक्षकांना त्यांचा मोबदला द्यायला नको काय? त्यामुळेंच ब्रिस्बेनचा सामना सुरू होण्यापूर्वी त्यानें आपल्या खेळाडूंना सांगितलें असावें, "यथेच्छ खेळा. खेळतां येत नसेल तर बाद व्हा. तुमची जागा दुसऱ्या खेळाडूला घेऊं दे. पण कंटाळवाणा, वेळ काढू खेळ खेळूं नका." ब्रॅडमन नंतर असा आत्मविश्वासानें आक्रमक पवित्रा टाकणारा वॉरेल हा पहिलाच कप्तान. या त्याच्या धोरणामुळेंच ऑस्ट्रेलियाचा संघ विजयाच्या क्षणापर्यंत आला असतांहि त्यानें इतर कप्तानांप्रमाणें अनाक्रमक गोलंदाजी करून आपल्या क्षुद्रमनाचे प्रदर्शन केले नाहीं. जॉन गोडार्ड यानें भारताविरुद्ध झालेल्या अखेरच्या सामन्यांत (१९४८-४९) ही वृत्ति प्रकट केली होती. परंतु वॉरेल हा खिलाडू वृत्तीचा. 'No risk no gain ! हें त्याचें ब्रीदवाक्य. अर्थात् वॉरेलचें हें आव्हान स्वीकारायला रिची बेनॉसारखा निधड्या छातीचा कप्तान होता. त्यानेंहि अखेरच्या क्षणापर्यंत सामना अनिर्णीत ठेवण्याची कोशिश केली नाहीं. सामना जिंकता येत नसेल तर वाटेल ते करून अनिर्णित ठेवण्याकडे आजच्या सर्वच कप्तानांचा कल असतो. पण क्रिकेटकडे पाहाण्याच्या या विशुद्ध धोरणामुळेंच ब्रिस्बेनचा सामना अखेरच्या क्षणीं समसमान झाला. "खेळांच्या इतिहासांतील सर्वोत्कृष्ट घटना" म्हणून या बिल (टायगर) ओरेली यानें या सामन्याबद्दल लिहिलें आहे. तर "Greatest test of all" म्हणून फिंगल्टननें या अविस्मरणीय सामन्यावर एक खास पुस्तकच लिहिलें आहे. या एकाच सामन्यामुळें वॉरेलचें नांव क्रिकेटच्या इतिहासांत अजरामर होणार आहे.

ब्रॅडमनच्या निवृत्तीनंतर (१९४८) आंतरराष्ट्रीय क्रिकेटमध्यें अनाक्रमक (Defensive) खेळाची सुरुवात झाली. सामना हरल्यास नामुष्की होते. राष्ट्राची इभ्रत जाते. ही चुकीची कल्पना सर्वच राष्ट्रांमध्यें रुढ झालेली दिसते. त्यातून हॅसेट हटनहि सुटलेले नाहींत. वस्तुतः या दोघांनींच इंग्लंड-ऑस्ट्रेलिया याच्या लढतींत (१९५३) सामने जिंकतां येत नसतील तर अनिर्णित ठेवण्याची परंपरा रुढ केली. भारत, पाकिस्तान इ. देशांनीं त्यांचें अनुकरण केलें. फक्त भारतीयांनाच "सामने अनिर्णित ठेवणारे कुशल खेळाडू" (Draw expert) म्हणून हिणविण्यांत काय अर्थ आहे ? या कंटाळवाण्या, धीम्या खेळांत प्राण ओतणारा, नवचैतन्य आणणारा आणि सबंध जागतिक क्रिकेटमध्यें कायापालट घडवून आणणारा वॉरेल हा पहिलाच कप्तान होय. वॉरेल-बेनॉच्या या धोरणामुळेंच भारतीय खेळाडूंनींहि आपलें खेळण्याचें धोरण बदललें. त्यामुळेंच भारतानें इंग्लंड विरुद्ध प्रथमच 'रबर' जिंकण्याचा पराक्रम करून दाखविला.

वॉरेलचा हा क्रिकेटकडे पाहाण्याचा दृष्टिकोन १९६१ सालच्या दौऱ्यांतील सर्वच सामन्यांत दिसून आला. सिडनेला झालेल्या तिसऱ्या कसोटी सामन्यांत तर त्यानें त्याचें प्रात्यक्षिकच दाखविलें. अवघ्या चौदा चेंडूत डेव्हिडसननें हंट कन्हाय आणि सोबर्स या रथिमहारथींना तंबूत पाठविले होते. आता वॉरेलची पाळी आली. त्यांतही संघाचा कप्तान म्हणून जादा जबाबदारी. सर्वांना वाटलें आतां वॉरेल ट्रेव्हर बेलीप्रमाणें कंटाळवाणा, धीमा खेळ खेळणार. पण निराशा हा शब्द वॉरेलच्या शब्दकोशांतच नाहीं.



अनुक्रमणिका

त्यानें डेव्हिडसनचा पहिलाच चेंडू आत्मविश्वासानें सीमापार केला. इतकेंच नव्हे तर कॉमी स्मिथच्या साहाय्यानें अवघ्या ६७ मिनिटांत १०० धांवा फळचावर लावल्या. त्यांत त्याच्या स्वतःच्या ८२ होत्या. दौऱ्यांतील तो त्याचा उच्चांक होता.

## अविस्मरणीय वॉरेल ट्रॉफी

या दौऱ्यांत वॉरेलनें अवघा एकच कसोटी सामना जिंकला. दोन ऑस्ट्रेलियानें जिंकले. एक अनिर्णित. एक समसमान ठरला. 'रबर' जिंकतां आलें नाहीं पण वॉरेलनें ऑस्ट्रेलियाच्या असंख्य प्रेक्षकांचीं अंतःकरणें जिंकलीं. कोणत्याहि परकीय संघाला मिळाली नाहीं इतकी लोकप्रियता त्यानें आपल्या संघाला मिळवून दिली. याचें प्रत्यंतर मेलबर्नच्या कसोटी सामन्यांत पाहायला मिळालें. तो सामना पाहायलाच मुळीं ९०,८०० प्रेक्षक होते. सर्व क्रीडांगण माणसांनीं फुलून गेलें होतें. शेवटीं वेस्ट इंडीजच्या संघाचा सत्कार करण्याची वेळ आली. प्रेक्षकांची तोबा गर्दी झाली. "१९५४ सालीं इंग्लंडच्या राणीचा अपवाद सोडला तर कोणाहि परकीय माणसाचा ऑस्ट्रेलियानें एवढा भव्य सत्कार केला नसेल," असें फिंगल्टन म्हणतो. प्रेक्षकांचा हा अमर्याद जनसागर पाहूनसुद्धां वॉरेलचें मन गहिंवरलें. सत्काराच्या शेवटचें आभाराचें भाषणहि त्याला करतां येईना. नाइलाजानें त्यानें तें काम मॅनेजर गेरी गोमेजला सांगितले. अखेर शेवटीं ऑस्ट्रेलियांत वॉरेलची चिरकाल स्मृति रहावी म्हणून ब्रॅडमननें "फ्रॅंक वॉरेल ट्रॉफी" वॉरेलच्या हस्तें बेनॉला दिली. इंग्लंडचा रक्षा करंडक (Ashes) प्रमाणेंच ऑस्ट्रेलिया वेस्ट इंडीज लढतीत विजेता ठरणाऱ्या संघाला ही ट्रॉफी यापुढें मिळणार आहे. या दौऱ्याचा समारोप करतांना फिंगल्टन लिहितो, "इतका यशस्वी दौरा क्रिकेटच्या इतिहासांत मी पाहिलेला नाहीं." तर "सिडने डेली टेलिग्राफ" या वृत्तपत्रानें लिहिलें. "They lost the series, but they won Australia."

## बार्बाडॉजचा अहंकारी तरुण

वॉरेलचा जन्म १ ऑगस्ट १९२४ रोजीं बार्बाडॉजमध्यें झाला. किंवा त्याचें संपूर्ण नांव फ्रॅंक मॉर्टिमर मॅक्लिन वॉरेल. कॉन्स्टंटाइन, हेडली किंवा वॉलकॉट या इतर वेस्ट इंडीज खेळाडूंप्रमाणें त्याच्या घराण्यांत क्रिकेटची पिढीजात आवड नव्हती. तो लहान असतानाच त्याच्या वडिलांनीं बार्बाडॉजला अखेरचा रामराम ठोकून ते अमेरिकेंत स्थाईक झाले. त्यामुळेंच त्याच्या आजीनें त्याचें संगोपन केलें. त्याला बालपणीं प्रत्यक्ष असे क्रिकेटचे धडे कुणीच दिले नाहींत. नाहीं म्हणायला त्याच्या वडील भावाला मात्र क्रिकेटची आवड होती. तो शाळेच्या दुय्यम संघांतून खेळला होता. पण फ्रॅंक वॉरेलला क्रिकेटचे जन्मजात आकर्षण होते. तथापि बालपणीं तो शालेय संघांतून प्रसिद्धीस आला तो मंदती गोलंदाज म्हणूनच. त्याचें गोलंदाजींतलें प्राविण्य पाहूनच त्याला शाळेच्या ज्यूनियर संघांतून अल्पावधींतच सिनियर संघांत घेण्यांत आलें. मग मात्र त्याला अस्मान ठेंगणें झालें. इतक्या लहान वयांत त्याला शाळेंतील नांवाजलेल्या खेळाडूंच्या संघांतून खेळण्याची संधि मिळाली म्हणून समवयस्क खेळाडूंना त्याचा द्वेष वाटूं लागला. त्यांतच शाळेच्या एका शिक्षकाशीं त्याचा झगडा झाला. त्यामुळें प्रिन्सिपॉलनीं वॉरेलची जाहीर खरडपट्टी काढली. आणि सरतेशेवटीं तर शिस्तभंगाखाली त्याला शाळेंतून हद्दपारच केलें. पण वॉरेलचें नशिब शिकंदर. प्रिन्सिपॉल पुढच्या वर्षी ऑपरेशनसाठीं रजा घेऊन अमेरिकेंत गेले आणि नव्या प्रिन्सिपॉलनीं वॉरेलवरचा निर्बंध दूर केला. त्याचें नशीब उघडलें. तो गोलंदाजाचा फलंदाज झाला.

## बार्बाडॉज संघाचा विक्रमीवीर

बार्बाडॉज संघामध्यें प्रवेश झाल्यावर (१९४३) त्याच्या कर्तबगारीला खरा वाव मिळाला. परंतु वॉरेलचें संघातील स्थान गोलंदाज म्हणून होते. त्यावर्षी त्याच्या आयुष्यांत एक चमत्कार घडला. एका सामन्यांत कप्तानानें त्याला 'नाइटवॉचमन' म्हणून पाठविले. त्यानें फलंदाजींतील आपलें नैपुण्य दाखविलें. शैलीदार खेळ दाखविला. त्यामुळेंच दहा नंबरावर फलंदाजी करणारा गोलंदाज वॉरेलला पुढील सामन्यांतून चार नंबरचा क्रमांक मिळाला. तो फलंदाज म्हणून चमकूं लागला. जॉन गोडार्डबरोबर केलेल्या त्यावेळच्या विक्रमी भागिदारीनें (१९४३-४४ साल. ५०२ धावांची भागिदारी) त्याचें नांव सर्वतोमुखी झालें. वॉरेलनें स्वतःच्या ३०८ धांवा काढल्या होत्या.

आणखी दोन वर्षांनीं आपला बालमित्र क्लाइड वॉलकॉट याच्या साहाय्यानें त्यानें आपला पहिला विक्रम मोडला. ५७४ धावांचा जागतिक विक्रम प्रस्थापित केला. त्यावेळीं त्यानें नाबाद २५५ धांवा काढल्या तर वॉलकॉटनें नाबाद ३१४ धावा काढल्या. अर्थात हाहि विक्रम भारताच्या हजारे गुलाम महंमद जोडीनें पुढें मोडला आणि ५७७ धावांचा जागतिक विक्रम केला. या काळांत वॉरेलनें शतकांवर शतकें काढली. वॉलकॉट, वीक्स, यांच्याप्रमाणेंच तो वेस्ट इंडीजमध्यें धावांचा पाऊस पाडणारा खेळाडू म्हणून लौकिकाला आला.




अहो ! प्रकाशकाची अंतिम इच्छा होती कीं मला न खपलेल्या पुस्तकांच्या चितेंत जाळा !!

## कसोटी सामन्यांत वॉरेल

त्याला कसोटी सामन्यांत प्रथम संधि मिळाली ती इंग्लंड-बरोबर १९४८ सालीं झालेल्या दुसऱ्या सामन्यांत. पहिल्याच प्रवेशांत त्यानें ९७ धांवा काढल्या. पुढील सामन्यांत दणदणीत शतक काढलें. त्या वर्षाची त्याची कसोटी सामन्यांतील सरासरी १४७ होती. यामुळें त्याला जागतिक प्रसिद्धी मिळाली. त्या-नंतर १९५० सालीं वेस्ट इंडीज संघ इंग्लंडला गेला. त्यावेळीं तर त्यानें वीक्स, वॉलकॉट यांच्याबरोबर अक्षरशः मैदानें गाज-वली. टीकाकारांनीं त्यांना 'थ्री डब्ल्यूज' म्हणून संबोधलें. त्यानें त्या दौऱ्यांत सहा शतकें काढली. तिसऱ्या कसोटी सामन्यांत त्यानें नॉटिंगहॅमला २६१ धांवा काढल्या. कसोटी सामन्यांतील धांव संख्या ५३९ झाली. त्यांतहि एक शतक व एक द्विशतक. त्याची सरासरी ८९ भरली. प्रथम दर्जाच्या सामन्यांतील त्याची धांव संख्या १७७५ झाली. सरासरी ६८ भरली. एकटा विक्स सोडला तर दुसऱ्या कुणाहि वेस्टइंडीजच्या खेळाडूनें इतक्या धांवा त्या दौऱ्यांत काढल्या नव्हत्या. त्याच्या गोलंदाजींतील बळींची संख्या ३९ होती. त्याच्या फलंदाजींतील नैपुण्यामुळें आणि शैली-दार खेळामुळेंच "विजडेन"नें त्या वर्षीच्या पांच प्रमुख खेळाडूंत त्याची गणना केली होती.

१९६२ सालीं भारताविरुद्ध झालेले कसोटी सामने सोडले तर वॉरेल एकूण ४१ कसोटी सामन्यांत खेळला आहे. इंग्लंड (२०) ऑस्ट्रेलिया (१४), भारत (५) व न्यूझिलंड (२) या संघा-बरोबर तो आजपर्यंत खेळला आहे. या अवधींत त्याच्या नांवा-वर ९ शतकें आहेत. त्यांतील दोन द्विशतकें. सुरवातीला चार क्रमांकाला फलंदाजी करणारा वॉरेल प्रसंग पडल्यास आघा-डीला जाऊनही नाबाद राहिलेला आहे. (१९५७ सालीं इंग्लंडविरुद्ध नाबाद १९१) कसोटी सामन्यांतील त्याची धांव-संख्या ३३८६ भरते.

भारतीय प्रेक्षकांना वॉरेल अपरिचित नाहीं. प्रथम तो जॉक लिव्हिंग्स्टनच्या संघाबरोबर भारतांत, (१९४९–५०) आला. पुन्हां लेस्ली एम्सच्या संघाबरोबर (१९५०–५१) आणि अखेर शेवटीं "सिल्व्हर ज्युबिली" संघाच्या बरोबर. (१९५३–५४) त्याचा अभिजात शैलीदार खेळ कुणाला आवडला नाहीं? त्याची खिलाडू वृत्ति आणि हंसरा चेहरा कुणाच्या परिचयाचा नाहीं? कानपूरला भारताविरुद्ध काढलेलें (नाबाद २२३) द्विशतक हीच त्याच्या स्वतःच्या मतें त्याची सर्वोत्कृष्ट फलंदाजी अशी कबुली त्यानें आपल्या आत्मचरित्रांत (Cricket Punch) दिली आहे.

## वेस्ट इंडीजचा आदर्श कप्तान

वेस्ट इंडीजमध्यें कप्तान निवडतांना खेळाडूच्या कर्तबगारीपेक्षां त्याच्या वर्णाकडे कटाक्षानें लक्ष पुरविलें जातें. त्यामुळेंच कॉन्स्टं-टाइनसारख्या विश्वविख्यात खेळाडूला डावलून ग्रँटसारख्या पोरसवदा गोऱ्या तरुणाला कप्तानपद मिळालें. हेडलीला अप-वाद म्हणून १९४८ सालीं इंग्लंडबरोबर पहिल्या एकाच कसोटी सामन्यांत नेतृत्वाचा मान मिळाला होता. त्यानंतर कप्तान-पद गोमेज, गोडार्ड, स्टॉलमेयर, डेनिस ॲटकिन्सन, अलेक्झांडर या गोऱ्या कप्तानांकडे कटाक्षानें दिलें गेलें. वॉरेलच्या बाबतींत मात्र क्रिकेट बोर्डाला आपली परंपरा आणि धोरण बदलावें लागलें. बदलणें भाग पडलें. इंग्लंडमध्यें हटनच्या बाबतींत जसें धोरण बदलून पहिल्या धंदेवाईक खेळाडूला कप्तानपद द्यावें लागलें, तसेंच वेस्ट इंडीज बोर्डालाहि वॉरेलच्या बाबतींत करावें लागलें. वस्तुतः त्यावेळीं वेस्ट इंडीजचें कप्तानपद अलेक्झांडरकडे होतें. परंतु ऑस्ट्रेलियासारख्या मातब्बर संघाशी सामना देण्या-साठीं वॉरेलसारख्या मुरब्बी कप्तानाची आवश्यकता होती. दौऱ्यावर जाणारा पहिला काळा कप्तान म्हणून बोर्डानें त्याची निवड केली.

## अविस्मरणीय व्यक्ति

शालेय जीवनांत शिष्ट आणि अहंकारी असणारा तरुण वॉरेल आपल्या पुढील आयुष्यांत 'परफेक्ट जंटलमन' म्हणून प्रसिद्धीस आला. याचें प्रमुख कारण म्हणजे लँकेशायर लीग-मध्यें त्यानें घालविलेले दिवसच होते. लीगमध्यें धंदेवाईक खेळाडू म्हणून त्यानें नांवलौकिक आणि पैसा मिळविला. पण मिळविलेला पैसा केवळ चैनीसाठीं न उडवितां त्यानें आपलें उच्च शिक्षण पुरें केलें. तो मँचेस्टर युनिव्हर्सिटीचा पदवीधर झाला. त्यामुळेंच जगांतील भिन्न स्वभावांच्या लोकांशीं मिसळण्यामुळें जगाचा बरावाईट अनुभव आला. त्याचा मूळचा अहंमन्य स्वभाव बदलला. त्यांतूनच आजचा कल्पक बुद्धीचा, धडाडीचा आणि केवळ आपल्या संघांतील खेळाडूनाच नव्हे तर प्रतिपक्षीय खेळा-डूंना आवडणारा खिलाडू वृत्तीचा वॉरेल जन्माला आला. क्रिकेटवर त्याचें मनस्वी प्रेम आहे. जयापजयाची पर्वा न करतां त्यांतील क्रीडानंदासाठींच क्रिकेट खेळावें अशी कीथ मिलर-प्रमाणेंच त्याची वृत्ति आहे. फलंदाजीतील सर्व बारकावे त्याच्या खेळांत प्रत्ययाला येतात. सहज, लीलया, कव्हर ड्राइव्ह मारण्यांत हजारे प्रमाणेंच त्याचें कौशल्य प्रत्ययाला येतें. तर वेगवान बंपरवर 'हुक' शॉट मारण्यांत ब्रॅडमन हेडली प्रमाणेंच तो वाकबगार आहे. जलदगती आणि मंदगती दोन्ही प्रकारच्या गोलंदाजीवर सहज, लीलया फटके मारण्यांत तो पटाईत आहे. पण त्याहिपेक्षां स्वतःच्या संघातील खेळाडूकडेच नव्हे तर प्रति-पक्षीय संघांतील खेळाडूकडे मैत्रीच्या भावनेनें पाहणारा, खिलाडू वृत्तीचा तो आदर्श कर्णधार आहे. त्यानें जागतिक क्रिकेटला नवें वळण लावलें. कायापालट केला आणि आक्रमक क्रिकेटचें जगाला प्रात्यक्षिक करून दाखविलें. त्यामुळेंच सारें क्रिकेटप्रेमी जग त्याचें आज आदरानें कौतुक करीत आहे. अभिनंदन करीत आहे.

●●●




# कथा क्रिकेटची व्यथा क्रिकेटपटूची



—दि. श्री. कराडकर

केन बॅरिंग्टनचें १९५४ सालीं लग्न झालें. दुसऱ्याच दिवशीं ॲनला उद्देशून एका वर्तमानपत्रानें लिहिलें **"अभिनंदन केनचे, सांत्वन—त्याच्या बायकोचे. कारण पुढील कांहीं आठवडे ती तिच्या नवऱ्याला मुकणार आहे."** [एका धंदेवाईक खेळाडूच्या **Running into hundreds'** ह्या रसिल्या आत्मचरित्राचा सुरस परिचय ]

**'बटाट्याची** चाळ'चा प्रयोग पाहत असतांना सतत अडीच तास प्रेक्षकांना हंसत ठेवणारे पु. ल. प्रेक्षकांना विचार करायला लावतात शेवटचं 'चिंतन' सुरू होतं तेव्हां. तें हृद्य चिंतन ऐकून प्रेक्षकही अस्वस्थ होतात. इंग्लडच्या केन बॅरिंग्टनचं Running into hundreds हें आत्मचरित्र कथन करणारं पुस्तक वाचत असतांना माझी थोडी अशीच अवस्था झाली. क्रीडांगणावर आपल्या मिस्किल वागणुकीनें प्रेक्षकांना खुषींत ठेवणाऱ्या बॅरिंग्टननें आपल्या निवेदनांतही मिस्किलपणा ठेवला आहे म्हणून मी सुरुवातीला खुषींत होतो. पण ह्या पुस्तकांतील शेवटचं प्रकरण The life of a professional सुरू झालं आणि बॅरिंग्टनचा खेळकर मिस्किलपणा अकस्मात् नाहीसा झालाय् असं माझ्या लक्षांत आलं. ह्या पुस्तकांतील हे एक चिंतनशील प्रकरण आहे. जितकं हृद्य तितकंच निर्भिड.

धंदेवाईक क्रिकेटपटूला जीवन नसतंच मुळीं असा बॅरिंग्टनचा दावा आहे. उत्तम संसार करणं, सणासुदीला बायको व मुलांचं कोडकौतुक करणं, त्यांच्याबरोबर सिनेमाला वा फिरायला जाणं, आपल्या वृद्धकाळीं कुटुंबियांसाठीं चांगली तरतूद करून ठेवणं, हे व आणखी खूप असंच कांहीं तरी जर उत्तम जीवनाचं चित्रण असेल तर हे सुखी जीवन धंदेवाईक क्रिकेटपटूच्या कधींच वांट्याला येत नसतं असं बॅरिंग्टननें स्पष्ट बजावलं आहे. तो लिहितो, "गेल्या चार हिवाळ्यांपैकीं तीन हिवाळे मी परदेशीं वास्तव्य करून होतों. वेस्ट-इंडिज, आशिया व ऑस्ट्रेलिया ह्या देशांत भरकटत होतों. हिवाळ्याच्या दरम्यान असलेल्या काळांत दक्षिण आफ्रिका व ऱ्होडेशिया ह्यांचे छोटे दौरे मीं केलें. मित्रहो, लक्षांत घ्या कीं, मीं ज्यावेळीं ब्रिटनमध्यें असतों त्यावेळींहि मीं खेळाच्या निमित्तानें घरापासून दूर असतों. कधीं परगण्यांतील सामने खेळायला तर कधीं निरनिराळ्या ठिकाणीं चाललेले कसोटी सामने खेळायला. १९६२ सालीं मीं ३६५ दिवसांपैकीं फक्त १६० दिवस घरीं होतो." नवरा रोज रात्रीं उशीरा घरीं परत येतो म्हणून कोकलणाऱ्या बायकोनें बॅरिंग्टनच्या बायकोची सहनशीलता मान्य करावी! खुद्द केनलासुद्धां हे मान्य आहे म्हणून तो लिहितो— "How would your wife like this sort of existence?"

केनची बायको ॲन खूपच समजुतदार आहे असं तो म्हणतो. १९५४ सालीं जेव्हां त्या दोघांचं लग्न झालं तेव्हां दुसऱ्याच दिवशीं ॲनला उद्देशून एका वर्तमानपत्रानें लिहिलं "अभिनंदन—केनचे, सांत्वन—त्याच्या बायकोचे. कारण पुढील कांहीं









आठवडे ती तिच्या नवऱ्याला मुकणार आहे."

सगळ्या क्रिकेटपटूंच्या बायकांची हीच व्यथा आहे. क्रिकेटपटूशी लग्न करण्यांत कांहीं फायदे जरुर असतील. निरनिराळे देश बघायला मिळतात, नाना देशांचे, नाना लोक भेटतात, सगळीकडे आनंद, मजा. हे फायदे झाले. पण तोटे जबरदस्त. नवऱ्याबरोबर नेहमींच परदेशगमन करायला मिळतं असं मुळींच नाहीं. अशावेळीं 'सजन गये परदेश' असं म्हणत घरीं बसावं लागतं. ब्रिॲन स्टॅथम गेल्या १२ हिवाळ्यांपैकीं ७ हिवाळे एकटा परदेशीं गेला होता. वेस्टइंडिजच्या दौऱ्यावर असतांना जेव्हां त्याला स्वतःचा मुलगा आजारी असल्याची तार मिळाली तेव्हां त्याला झालेल्या आंतरिक वेदना तो एकटाच जाणूं शकतो. बायकोच्या विनंतीला मान देऊन दौरा अर्धवट टाकून तो इंग्लडला निघून गेला. अगदीं हीच अवस्था प्रत्येक क्रिकेटपटूची असते, कथा वेगळी, व्यथा एक !

हिवाळ्यांत क्रिकेटपटू 'घराबाहेर' असतात आणि हिवाळ्यांतच वर्षातला त्यांचा मोठा सण—नाताळ, साजरा होत असतो. घरच्या दिवाळीला मुकण्यासारखं दुःख दुसरं कोणतंही नाहीं. खुद्द बॅरिंग्टन १९५९ च्या नाताळांत वेस्टइंडिजमध्यें बॅटीच्या साह्यानें बॉल चिवडीत बसला होता. १९६१ सालीं हीच कथा. त्यावेळी तो कलकत्त्याला होता. तर १९६२ सालीं दक्षिण ऑस्ट्रेलिया विरुद्धच्या एका सामन्यांत तो नाताळचे चेंडूरूपी कंदील हवेंत सोडत होता !

स्वतःच्या सुखी संसारावर असा निखारा ठेवून क्रिकेटपटूला आर्थिक लाभ तरी किती होतो ? असा रोकडा सवाल बॅरिंग्टननें केला आहे. उत्तरादाखल तो लिहितो, "आम्हीं वर्तमानपत्रांत नेहमीं फुटबॉलपटूंच्या भरघोस वेतनाबद्दल वाचतो. पण आम्हां क्रिकेटपटूंच्या वेतनाबद्दल कितीजणांना वाचायला मिळतं ? क्रिकेटपटूचं वेतन देशोदेशी निरनिराळं असतं. तरीपण चांगल्या परगण्यांतील यशस्वी खेळाडू वर्षाला १०,००० ते १३,००० रुपये सहज मिळवूं शकतो आणि प्रत्येक कसोटी सामन्यासाठीं जर त्याची निवड झाली तर हीच रक्कम दुप्पट धरावी."

इंग्लडमध्यें सांप्रत कसोटी सामन्याची बिदागी १,३०० रुपये आहे; म्हणजे पांचही कसोटी सामन्यांसाठीं निवड झाली तर खेळाडूला ६,५०० रुपये मिळूं शकतात. ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर गेल्यावर पांच कसोटी सामने व इतर सामने मिळून खेळाडूला १४,३०० रुपयांचा लाभ होतो. ह्यांत अर्थात् चांगल्या वागणुकीबद्दल जो बोनस देतात तो आला. ह्या धनलाभाव्यतिरिक्त चांगल्या खेळाडूला इतर गोष्टींपासूनसुद्धां धनलाभ होऊं शकतो. त्या गोष्टी म्हणजे तयार कपड्यांवर स्वतःचं नांव घालूं देणें, पुस्तकें लिहिणें, वर्तमानपत्राकरितां लेख लिहिणें आणि कोणत्याही जाहिरातीसाठीं स्वतःच्या नांवाचा वापर करूं देणें !

इतकं असूनही धंदेवाईक क्रिकेटपटूची मिळकत डोळ्यांत भरण्याइतकी मुळीच नाहीं. कारण अमेरिकेंत जॉकी वर्षाला सरासरी १३ लाख रुपये मिळवितो तर कांहीं देशांतून सायकलपटू, टेनिसपटू, बॉक्सर आणि फुटबॉलपटू वर्षाला ४ ते ५ लाख रुपये सहज मिळवितात. हे वाचून सगळ्या बाजूंची मिळकत जरी लक्षांत घेतली तरी उत्कृष्ट इंग्लिश–क्रिकेटपटू वर्षाला ५० हजार रुपयांच्याहून अधिक मिळकत निश्चित मिळवूं शकणार नाहीं; हे निखालस खोट नाहीं.

आपलें चिंतन पुढें ठेवून बॅरिंग्टन लिहितो, "ठराविक मार्ग सोडल्यावर क्रिकेटपटूला आणखी धनलाभ कोठून मिळूं शकेल ? एकच मार्ग ! तो क्रिकेटच्या खेळामधून पेन्शनींत निघाला कीं, त्याच्या नांवानें एक 'मदत सामना' खेळण्यांत येतो. ह्या सामन्यांत जो नफा होईल तो ह्या क्रिकेटपटूला देण्यांत येतो. साधारणपणें क्रिकेटमध्यें १० वर्षे जीवन घालविल्यावर असा 'मदत सामना' भरविण्यांत हरकत नाहीं. अशा सामन्यांनीं फारच थोड्या इंग्लिश खेळाडूंना घवघवीत फायदा मिळवून दिला आहे. सिरील वॉशब्रूकला





अनुक्रमणिका

१,८०,००० रुपये तर ब्रिअॅन स्टॅथमला १,७०,००० रुपये हे दोन फायदे नांव घेण्यासारखें आहेत. प्रत्येक खेळाडूला ह्या सामन्यांपासून फायदा मिळतो असं मुळींच नाहीं. कांहीं खेळाडूंच्या नशिबी तर असे सामने मुळीच नसतात. त्यांचं काय ?"

बॅरिंग्टन पुढें लिहितो, 'कांहीं क्रिकेट-पटु भवितव्यासाठीं कांहींच 'बचत' करूं शकत नाहीं. त्यांची भविष्याची चिंता ही खरी चिंता आहे. म्हणूनच डब्ल्यू. जी. ग्रेस पन्नाशींत क्रिकेटची बॅट हातांत धरत होता. तीच गोष्ट हॉब्सची. पण हे जुन्या दिवसांतलं, अलीकडें चाळीशी संपली कीं, क्रिकेटमधील जीवनही संपतं; ज्या चाळी-शींत इतर लोक आपल्या धंद्यांत ऐन उमेदीत असतात !"

एकूण काय क्रिकेटच्या धंद्यांत मेह-नत जास्त पण पगार कमी अशी स्थिति आहे. तर मग इतर धंद्यांप्रमाणें पगार वाढवून घेण्यासाठीं क्रिकेटमध्यें 'युनियन'ची स्थापना कां होऊं नये ?

"युनियन्स ?" बॅरिंग्टन सवाल करतो आणि पुढे म्हणतो, "युनियनची काय भानगड असतें हे मला ठाऊक नाहीं पण 'क्रिकेटपटूचें युनियन' स्थापन व्हावें ह्या मताचा मीं मुळींच नाहीं. कारण क्रिकेटचं स्वरूप असं आहे कीं, पगार वाढला तर धांवा वाढतीलच ह्याची खात्री नाहीं व पगार वाढला नाहीं तर धांवा कमी होतील असंही नाहीं !"

क्रिकेटमधील ह्या दुःखांचा पाढा वाचल्यावर बॅरिंग्टननें क्रिकेटमधील सुखी जीवनाचाही विचार केला आहे. तो लिहितो, "क्रिकेटमुळें मीं जवळ जवळ सगळं जग पाहूं शकलों. खूप फिरलों मी. ऑस्ट्रेलिया...वेस्ट इंडिया...भारत... पाकिस्तान...सिलोन...दक्षिण आफ्रिका ...ऱ्होडेशिया...मी क्रिकेटपटू नसतों तर हे देश मी कधींतरी बघितलें असतें कां ? ज्या देशांत मी गेलों त्या देशांत मी माझी स्वतःची भरपूर करमणूक करून घेतली. भारतांत मी आगगाडी चालविली तर वेस्ट-इंडिजमध्यें एक हॉस्पिटलांतील ऑपरेशनचें कार्य मी पाहिलें तर एका बॅन्ड मेळाव्याचें संचलनही मी केलें.....!"

'क्रिकेट'मध्यें पराक्रम गाजविला कीं, नांव आपोआप गाजले जातें. त्यामुळें ओळखी वाढतात, समाजांत मान मिळतो, देशांत सन्मान होतो. लोकांच्या उत्सा-हाला नुसतें उधाण येतें. पुढें बॅरिंग्टन लिहितो, "इतके लोक केवळ आपल्या-साठीं 'पागल' झाले आहेत असं जेव्हां समजतं तेव्हां तर अंगावर मूठभर मांस चढतें; पण मस्तक कृतज्ञतेनें नम्र होतं आणि ज्या क्रिकेटमुळें हे वैभव लाभलं त्या क्रिकेटबद्दल तर कसं उतराई व्हावं हेच कळत नाहीं !"

शेवटीं बॅरिंग्टन लिहितो, "पुन्हां मी हेच सांगतो कीं, क्रिकेटमुळें गृहसौख्य नीट उपभोगतां येत नाहीं आणि ही सर्वांत ह्या खेळांतील वाईट गोष्ट पण सर्वांत चांगली गोष्ट ही कीं क्रिकेट सारखा खेळ दुसरा नाहीं !"

बॅरिंग्टनचें हे चिंतनशील विचार क्रिकेट शौकिनांना जरूर चिंतन करायला लाव-तील. ह्यांतून मार्ग काय ? क्रिकेटचा खेळ आटोपशीर करतां येईल कां ? छोट्या मुदतीचें दौरे घडवून आणतां येतील कां ? वा दौऱ्यावर गेलेल्या प्रत्येक क्रिकेट-पटुला स्वतःची बायको क्रिकेट-बोर्डाच्या खर्चानें दौऱ्यावर नेता येईल कां ? चाळीशी नंतर होणारी क्रिकेटपटूची परवड कशी थांबवितां येईल ? हे व अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न बॅरिंग्टनचा हा लेख वाचून मनांत उद्‌भवतात. हे प्रश्न निरनिराळ्या क्रिकेट मंडळांनीं तर सोडवावेच पण विशेषतः 'राष्ट्रकुटुंब क्रिकेट परिषदे'सारख्या उच्च पातळीवरून हे प्रश्न सोडविण्यासाठीं प्रयत्न केले जावेत !

●●●

## सुरुवात आणि शेवट

**सुविख्यात क्रिकेटपटु डॉन ब्रॅडमन हा जेव्हां प्रथम कसोटी सामन्यांत खेळावयास उतरला तेव्हां अगदीं पहिल्या सामन्यांत त्यानें अवघ्या अठराच धांवा काढल्या होत्या. धावांचा डोंगर रचणारा म्हणून प्रसिद्ध असलेल्या या फलंदाजानें पहिली सलामी अशी दिली असेल हें कोणाला सांगून खरेंच वाटणार नाहीं.**

**याच वीरानें आपल्या क्रिकेट निवृत्तीपूर्वीच्या शेवटच्या सामन्यांत केलेला पराक्रम ऐकून तर तुम्ही आश्चर्यानें थक्कच व्हाल. आपल्या कसोटी क्रिकेटचा निरोप घेतांना ब्रॅडमनच्या वांट्याला अक्षरशः भोपळा आला**

## सर्वत्र १७७

**भारत-पाकिस्तानच्या एका कसोटी मालिकेंत मद्रास येथें झालेल्या भारत विरुद्ध पाकिस्तान या चौथ्या कसोटी सामन्यांत खेळाडूप्रमाणेंच १७७ या आंकड्यानेंहि मोठी गंमत केली.**

**पॉली उम्रीगरच्या जोडीला जेव्हां चंदू बोर्डे खेळावयास आला तेव्हां भारताच्या १७७ धांवा होत्या.**

**उम्रीगर बाद झाला तेव्हां त्यानें भागीदारीत केलेल्या धावांची संख्याहि १७७ च होती.**

**इजा बिजा अन् तिजा साधण्यासाठींच कीं काय शेवटीं जेव्हां डाव संपला तेव्हां बोर्डेने नाबाद राहून काढलेल्या धांवाहि १७७ च होत्या.**

**सदानंद चेंदवणकर**








ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन



# एका सुस्वरूपाची विटंबना व जीवनसत्याची कुचंबणा

**रात्र काळी...घागर काळी • जाग**

**चिं.** त्र्यं. खानोलकर-लिखित "रात्र काळी... घागर काळी" ही मौज प्रकाशनची नवी कादंबरी ! पूर्वी '**रहस्यरंजन**'मध्यें "झाडें नग्न झालीं" या नांवानें एक लघु कादंबरी प्रसिद्ध झाली होती. परंतु ज्या प्रकारें या कथावस्तूला लेखकाला रूप द्यायचें होतें तें मूळ कृतींत दिलें गेलें नसल्यामुळें 'रात्र काळी... घागर काळी...' असें तिचें पुनर्लेखन करण्यांत आलें. आतां ती वाचून लेखकाला या कथा-वस्तूला जें रूप द्यायचें होतें तें रूप त्याला गवसलें आहे किंवा कसें तें वाचकांनीं ठरवायचें आहे.

लेखकानें ही कादंबरी प्रसवण्यासाठीं दोन तीन बाळंतपणें केली. राज्य सरकारच्या स्पर्धेत पहिली आलीच पाहिजे अशा जिद्दीनं ती लिहिली. कोणता परिसर आपल्या कथानका-साठीं कादंबरीकारानें निवडलेला असावा हा ? पूर्वीचं सावंतवाडी संस्थान. कुडाळ पेटा असावा बहुधा. कारण केमळेकरांना संस्थाननें न्यायाधीश केलेलं असतं. म्हणजे आजपासून पंचवीस तीस चाळीस वर्षें मागें चला ना. सामाजिकता तरी या कादंबरीची कोणती मानायची ? लक्ष्मी ही ब्राह्मण कुळां-तली आहे हें सहज समजतं. यज्ञेश्वर बावांची मुलगी. कोण हे यज्ञेश्वर बावा ? कदाचित् कऱ्हाडे असावेत. लक्ष्मीच्या गांवाची भौगोलि-कता तर कोणती मानायची ? राहून राहून डोळ्यासमोर येतें तें एक देऊळ. एक रुक्मिणी भावीणीचं घर. खाडी...पलिकडचं अंत्रेचं देऊळ. दास्याचं घर.. केमळेकराचं घर.. एक रस्ता... नग्न खुळ्याला नागड्यानें नाचण्यासाठीं... गांवांतील इतर सामाजिक यंत्रणा....कांहीं पत्ता लागत नाहीं. एक न्यायाधीश.. एक व्यापारी..बाकीचे भटजी.. दोन तीन भाविणी.. एक चांदबाबा मुसलमान..रस्त्यांतील दिवे लावत व हिंदी चित्रपटांतल्यासारखं कांहीं विशिष्ट बोल बोलत फिरणारा.. एक गोडकर.. रात्रीच्या कहाण्या सांगणारा... बामन्या... लाळ ओकीत खोंगी घालून बसणारा... एक कुत्रा.. एक पोपट... पिंजऱ्यांतला... एक साप... एक फोडासारखी पाण्यावर तरंगणारी घागर.. काळे केस... बिचारी आतेबाई ? परकरी कुसूम ! बावळी बकुळ ! नाजुक खटखटे ! ओथंबलेला अण्णा ! ...गर्भ जिरलेली जाई ! ऐन वेळीं येणारी बैलगाडी. ..गाडी-वाला... बैल.. घुंगुर...अस्थि.. बोचकं..मग सावंतवाडीला मोटर गाडी..मग कृष्णा नदी... गांवांत एकटीच बकुळा. आणखी गांवाचं स्वरुप कसं होतं, तिथली जीवनरीती कशी होती, सामाजिक समस्या कोणत्या होत्या, परंपरा काय, आर्थिक व व्यावहारिक घडण कशी होती.... बाकीचं गांवाचं मानसशास्त्र, समाजशास्त्र, शासनतंत्र.....कादंबरींत कुठेंहि स्पर्शिलें जाण्याची कादंबरीकाराला जरुरी वाटलेली नाहीं. लेखकाच्या कादंबरीच्या कक्षेत ती बाब कुठेंच बसत नसावी.

मग ही कादंबरी सामाजिक मानावी काय ? कीं प्रादेशिक ? कीं मनोवगाहन कर-णारी मानस शास्त्रीय ? कीं युरोपमधील नव्या अॅबसर्ड (absurd) वाडींतली कुठल्याच ठोकळ व ठळक विभागांत न पडणारी ? ही कादंबरीच तरी कां ? कीं आणखी कांहीं नवा लेखन उठाव ?....

ही कादंबरी सारखी श्री. ना. पेंडशांच्या कादंबऱ्यांची आठवण करून देते. लेखक कळत न कळत सारखी रचना करीत जातो ती थेट पेंडशांसारखी. पण पेंडसे रचतात तें जीवन ते जगल्यासारखे तरी वाटतात. हें काय ? इथें या पहिल्याच कादंबरींत लेखक करीत आहे ती केवळ उसनवारी. शुद्ध उसनवारी. दोन्ही प्रकारची. तंत्राची व अनुभूतीची. अभि-व्यक्तीची तर ढळढळीतपणें. एका ब्राह्मण कुटुंबांतील कुणी ही लक्ष्मी कुणा दिगंबराकडून टाकली जाते कां ? तर ती शुद्ध नाहीं म्हणून. ती शुद्ध नाहीं कां ? तर ती सुंदर असते म्हणून ? तिचा दिगंबरशी विवाह होतो कां ? तर यज्ञेश्वर बावांना तसं वाटतं म्हणून. दिगंबराऐवजी बिचारी लक्ष्मी आयुष्यभर नंतर दिगंबर होते....

दिगंबर म्हणे राक्षसासारखं तिच्यावर घालून घेतो. (थेट कुत्रे झोंबीचा मानवी प्रकार) 'उपभोगानं तिचा खून करण्यासाठीं.' आणि चुकार वीज पडून तिला सद्रू होतो. तेंच पाशवी कृत्य दिगल्या परकरी जाईवर उधळतो आणि तिला गर्भ राहतो.

तेंव्हांपासून लक्ष्मीच्या जीवनाचे धिंडवडे सुरूं होतात. त्याला कांहीं सुमार ? त्याला कांहीं कार्यकारण परंपरा ? उत्तर एकच म्हटलं तर. लेखकाला तसं वाटतं म्हणून. आणि लेखकाला तसं कां वाटतं ? किंवा वाटत असावं ? तर कादंबरींतील स्वनिर्मित पात्राप्रमाणेंच लेखकालाही—लक्ष्मीचा आपला नागडा उघडा, शुद्ध शिल्पासारखा (तिच्या मांसांतून दिसणारं तें शिल्प ! ) दिसणारा, तिचा मुलगा बकुळीशीं व तिच्याच सारख्या एका स्त्रीशीं संग करूं लागला तरी ताजा-तवाना रहाणारा, असा स्त्रीदेह हवा तसा खेळायला मिळतो. तिच्या त्या तशा देहामुळें कादंबरीकाराच्या लेखणीचे खेळ चालतात शाब्दिक कसरतीचे व मानसिक विकृतीचे. या कादंबरींतील लेखकाकडून झपाटलें गेलेलें एकच पात्र म्हणजे लक्ष्मी. अंतीं लक्ष्मीकडून तोही झपाटला जातो.

लक्ष्मी ही या कादंबरींत कादंबरीकाराला जडलेली एक बुरशी व बेढब विकृती आहे.



अनुक्रमणिका

-(अशीच एक 'अजगर' नांवाची कादंबरिका या लेखकानें लिहिली आहे. किंचित् वास्तव, अवास्तव व अतिवास्तव यांचं भडक, भेसूर, वीभत्स, अजगरासारखंच गुळगुळीत विळ-विळीत कांहीं तरी....) लक्ष्मीशीं शब्दसंभोग घेण्यांत पानापानांत व ओळी ओळींत लेखक लडबडन रंगलेला आहे. अणि तरीहि वाटत रहातं... 'ती केवढी ! तो केवढा !'...लक्ष्मी जें जीवन जगते, जें वर्तन करते, त्याचा भोंव-तालच्या वास्तवाशीं कुठेंच मेळ बसत नाहीं.... तसं पाहिलं तर लक्ष्मीची ही कथा एका संस्थानांत घडते. कोणतं चित्र त्यावेळच्या समाजाचं त्यामुळें आपल्या डोळ्यांसमोर उभं केलं जातं ? दिगंबर फक्त निमित्त मात्र. केमळेकर. हा कोण ? कुठला ? तिच्या खिडकींत येऊन नमस्कार काय करतो ? तिला घर बांधून काय देतो ? कोंकणांतील ब्राह्मण समाजांतील एक मुलगी.. शिवलीला-मृत वाचणारी... यज्ञेश्वर बाबाची तेजस्वी कन्या... कुणा केमळेकराकडे वस्तीला जाते. आणि गांव उगी रहातो. गांवांतला ब्रह्मसमाज मुकाट बसतो. लेखकाला समाजाचं (त्या वेळच्या) सामाजिक ज्ञान तरी झालं आहे कां ?

आतां लेखकानं चितारलेली भावीण. भाविणीला लक्ष्मी आपल्या घरांत घेते. पाळते. जोपासते. तिची शुश्रूषा करते. घरांत वावरूं देते. त्या वेळच्या समाजांत कधींतरी अशी घटना घडूं शकली असती कां ? लक्ष्मीला ती भावीण आहे हेंच बरेंच दिवस कळत नाहीं. म्हणजे लक्ष्मीला भोंवतालचं समाजचित्र अपूरं अज्ञातच होतं कीं काय ?

कादंबरींतील घटनांना तरी लक्ष्मीच्या मनांत घडणाऱ्या संघर्षाच्या संदर्भांत कांहीं सुसंगति व अर्थ आहे का ?

ती सदूला वाढवते. तिच्याकडेच बकुळा वाढते. पुढें सदू व बकुळा प्रेमांत पडतात. लक्ष्मीला तें नको असतें. म्हणून बकुळा वामनशीं लग्न करते व दाजीशीं संग करते. कां ? कशासाठीं हें सारं ? लक्ष्मीच्या मनो-व्यापारांतील कोणता अचूक पापुद्रा लेखकाला उलगडून दाखवायचा आहे ?.. तर आपण उच्च कुळांतील आहोंत हा. छान ! ती म्हाताऱ्या अण्णाला खुशाल जवळ बोलावते. कां ? तर एखादा माणूस तिला आवडला म्हणजे तिला लाज वाटत नाहीं.

लक्ष्मीचा लैंगिक कोंडमारा झाला आहे हें खरं. तिचा दोष नसतांना. मग ती कोंडी फोडण्यासाठी लक्ष्मीला केमळेकरापासून तो दाजीपर्यंत (सगळे बुळे म्हातारे), आणि वामन्यापासून अण्णापर्यंत आपलं मांस शिल्प उघडं टाकावं लागावं, हाच लक्ष्मीच्या जीव-नाचा परिपोष. हीच ती व तेवढीच लक्ष्मी लेख-काला कादंबरी रूपानें महाराष्ट्राला द्यायची आहे कां ?... आणि ती सुद्धां लक्ष्मी किती वर्षांपूर्वीची ?... प्राचीन काळांतली. आजच्या जीवनांत तिला उगीच शोधूं नका. लेखकाचं परकायाप्रवेशाचं सामर्थ्य केवढं ? तर तो तीस चाळीस वर्षें (जेव्हां संस्थानें होतीं) मागे जातो. तो काळ प्रवेश करूं शकत नाहीं पण कायाप्रवेश करतो. (हें निर्मितीचं वेड. घ्यास.. गवसणें.. वगैरे).. अखेरीला कादंबरींत घटना घडतात त्या कोठल्याहि हिंदी सिनेमांत सुद्धां घडत नसाव्यात. सदू खुन्या कुत्र्याकडून खाल्ला जातो.. (दैव दुर्विलास ! दुसरें काय?.. कारण तो खुन्या त्यानें लक्ष्मीसाठी पाळलेला असतो. तिचा तो घोट घेणार होता.. (शेक्स-पीयरचा हॅम्लेट आठवा. म्हणूनच कुणा एका आरडा करणाऱ्या टीकाकारानें या कादंबरी-काराची शेक्सपीयरशीं तुलना केली नसेल ना ? आणि अग्रलेख लिहून मराठींतील या वर्षीची एकमेव कादंबरी म्हटलें नसेल ना?) ... तर होतं काय ? कीं सदू लक्ष्मीच्या दारांत 'आई' म्हणून मरतो. तोपर्यंत तो तिला लक्ष्मीच म्हणतो. रांड म्हणतो...शेवट कसा होतो ? लक्ष्मी सदूच्या व जाईच्या अस्थि घेऊन कृष्णेवर जायला निघते. सावंतवाडी-पर्यंत चक्क बैलगाडींतून... मग मोटरनें बरं. एकटीच... (शरदबाबूंना आठवा...) ती वाटच पहात असते जणूं !

या कादंबरींत वावरणारी एकमेव नियती म्हणजे तिचा विकृती पिडीत लेखक. पुनः पुनः मिळून लेखकानें कमाई कशाची केली असेल तर ती सुललित रीत्या प्रकट होणाऱ्या घोटीव व आंखीव भाषाशैलीची (लेखकाचें अलिकडे त्याच्या काव्यांत व कथांतही तेंच होत आहे): भाषेचा पुष्कळदां जाणवणारा काव्यमय विलास बरा वाटतो (पण त्याचीहि अति झाली आहे !) पण कादंबरीसारखी कलाकृति केवळ भाषाविलास नव्हे. मानवी मनोव्यापाराचें कादंबरींतील चित्रण म्हणजे ब्रह्मानें निर्माण केलेल्या मूळ मानवी सृष्टींतूनच तुल्यबळ अशी कलाकाराच्या प्रतिभेंतून निर्माण झालेली प्रति शब्दसृष्टी. कादंबरी-कार हा समाजाला केवळ एक भावना देऊन थबकतो असे नाहीं; तो समाजाला एक त्याला कधीं कधीं सहज न पेलणारा व न परवडणारा प्रभावी विचार पण देत असतो. कारण सामा-जिक वेदनेनें व्याकुळ झालेला श्रेष्ठ कलावंत हा त्या वेदनेमागील वैचारिकता प्रथम दृढ बुद्धीनें व अपार करूणामयतेनें टिपतो. त्याची कलाकृति ही त्याच्या आत्मानुभवांतून उमळणारी, उलगडणारी, व जन्म पावणारी एक वस्तुनिष्ठ व सत्यपूर्ण शब्दसृष्टि असते. त्या सृष्टीचा तो प्रभू असतो व त्या प्रभूच्या विश्वांत वावरणारा वाचक हा स्वानुभूत स्वजीवनाचं कोणतं तरी परानुभूत गतिमान दर्शन घेऊन पावन होतो व पुष्ट होतो. त्याच्या वैचारिकतेला बसलेले भावनेचे अडसर तो अलगद दूर करतो व अधिकाधिक समाज-निष्ठ व जीवन सन्मुख असा तो होत असतो. तो विस्तृत होतो. व्यापकता त्याला मिठी मारते. त्याच्या संकुचित व रोगट संज्ञाप्रवाहां-तून तो स्वच्छ निर्मळ भाववाहिनींत प्रसन्न-पणें डुंबूं लागतो.

अलिकडे मराठींत समीक्षक 'डेप्थ'(depth) 'डायमेन्शन' (Dimension) हे शब्द वापरूं लागले आहेत. त्यांच्याच शब्दांत सांगायचं तर या कादंबरीला डेप्थ आहे का ? उत्तर अर्थातच शून्य. या कादंबरीच्या 'डायमेन्शन्स' तरी ?.... अर्थातच 'डेड' झालेल्या. मग आतां उरलं काय ? 'डिलीव्हरी ?' (Delivery).... ती मात्र आहे. या कादंबरीची 'सेव्हींग ग्रेस' (Saving graces) म्हणजे लेखकाला साधलेली ही 'डिलीव्हरी.' म्हणून तरी शेवटपर्यंत ही कादंबरी वाचवते.

एवढा मोठा घोळ या कादंबरीवर घालण्याचे वास्तविक कांहींच कारण नव्हतें. पण या कादंबरीकाराबद्दल अजूनहि कांहीं अपेक्षा बाळगाव्याशा वाटतात. पुनः पुनः लिहून पूर्णतेकडे जाण्याची ईर्षा त्याच्याकडे आहे.





त्याला शैलीचें लेणें लाभलें आहे व भाषेवर त्याचें प्रभुपण बरवें आहे. तो उसळी घेऊन लिहूं शकतो व उत्कटतेनें संवेदनाक्षम होऊं शकतो. मात्र आत्मविवश अवस्थेंतून तो स्वतःला मुक्त करून कलानिर्मितीचें पूर्ण वाढ झालेलें तांटस्थ्य साधूं शकत नाहीं. या कादंवरीकाराला प्रतिभेचा स्पर्श झालेला असूनहि त्याची प्रतिभा अजून पौढ झालेली नाही. तिची वैचारिकता खुंटलेली आहे तर तिची भावक्षमता प्रमाणाबाहेर वाढलेली, फुगलेली व म्हणूनच विकृतीकडे गेली आहे. त्याच्या निर्मितीक्षम प्रतिभेची प्रकृति मूलतः पुष्टतेकडे जाणारी आहे; पण तिला रोगटपणाची कीड पोखरत असावी, असें वाटतें. लेखक आपलीच एक मानसकन्या किंवा मानसपुत्र शब्दसजीव करतो. त्याच्याशीं किंवा तिच्याशीं आपल्या अपुऱ्या फुरंगटलेल्या भावभावनांचें प्रावर्तन (Projection) साधतो व अशा रीतीनें शेंकडों पानें आत्मभोगांत रममाण होऊन विकृतीचे एक विश्व तो निर्माण करतो. भोंवतालच्या भव्यभीषण वास्तवाशीं वियोग पावून तो आत्मलिंगाशीं संयोग पावतो. आजच्या बहुतेक मराठी कादंबरी लेखनाची प्रक्रिया ठामपणें कांहींशी ही अशी आहे. निदान या प्रकाराच्या जवळपास येणारी तरी आहे.

चि. त्र्यं. खानोलकर तर उघड उघड या कादंबरींत पेंडशांचे आंधळे अनुकरण करतात. ते शरदबाबूंचेंहि असेंच विचारशून्य अनुकरण करतात. कदाचित् सार्त्रसारख्या किंवा कामूसारख्या पाश्चात्य कादंबरीकाराचें देखील ते अप्रबुद्ध अनुकरण करीत असावेत. त्यांना ज्या स्वरूपांत या कथावस्तूला रूप द्यायचे होते, तें स्वरुप प्रारंभापासून विद्रुप होऊनच त्यांच्या समोर उभें ठाकलें असावें. कारण होते ती शेवटी लक्ष्मीच्या सुस्वरूपाची विटंबना, तिच्या देहाची विदारणा आणि एका जीवनसत्याची कुचंबणा! 'झाडें नग्न झालीं.....' याचें 'रात्र काळी...' हें पुनर्लेखन. त्यांत आतां 'तें रुप' गवसले कीं काय हें ठरविण्याचा माझ्यासारख्या समीक्षकाचा हा आपुलकीचा अट्टाहास! शेवटीं गवसतें काय? लेखक सगळेंच, कांहीं गमावून बसला आहे; कारण कधी काळीं त्याला कांहीं सांपडलेंच नव्हतें. (आणि सांपडणार तरी कसें?)

**—प्र. श्री. नेरुरकर**

[**रात्री काळी...घागर काळी** (कादंबरी)
लेखक : **चि. त्र्यं. खानोलकर,**
मौज प्रकाशन, किं. ६।। रु.]

## 'कामां'त गुरफटलेले वास्तव चित्रण

**कामवासना** ही एक सनातन वासना. शांताराम पाटील यांची लेखणी प्रामुख्यानें रंगते ती याच भावने भोंवती! मुळांतच चविष्ट असणारा हा विषय यश मिळवून देण्यास जितका सोपा तितकाच श्रेष्ठ दर्जाची कथा निर्माण करण्यास कठीण. या विषयावरची कथा यशस्वी होण्यास नेहमीपेक्षां वेगळा (सांकेतिक नसणारा) अनुभव आणि समर्पक शब्दांत त्याची हाताळणी आवश्यक असते. शांताराम पाटलांच्या या संग्रहांत दोन्ही तऱ्हेच्या कथा आढळतात— यशस्वी झालेल्या आणि सांकेतिक. एकाच विषयावर लिहिलेल्या कथांमधील अनुभवाच्या पातळ्या भिन्न आहेत. कामभावनेच्या विभिन्न छटांचें दर्शन तिथें होते. त्यामुळें कथांमध्यें आपोआप विविधता येते. मात्र कधीं कधीं त्या कमालीच्या वास्तव बनतात तर कधीं कधीं संपूर्ण सांकेतिक! उदा. 'दर्द', 'जखम', 'रात्र', 'अतृप्ता', 'डंख', 'काहूर,' या यशस्वी ठरलेल्या कथा आणि 'जाग', 'पाचोळा,' 'आव्हान' व अडाणी' या सांकेतिक ठरणाऱ्या कथा.

'जाग' मधील कथांत पुरुषचित्रणाला वाव कमी. खरें म्हणजे पाटील स्त्री चित्रणांतच जास्त रमतात—नव्हे ते प्रभावी स्त्रीचित्रें निर्माण करतात. 'जखम' मधील वेणू, 'अतृप्ता' मधील बायजाबाई, 'दर्द' मधील मुश्तरी, जिद्दीमधील पार्वती ही काही ठळक उदाहरणें. शेवटपर्यंत अतृप्ता राहणारी व कोवळ्या पोराना आपल्या नजरेचे भक्ष्य बनविणारी बायजाबाई लोक आपल्याकडे एकाच विकृत दृष्टीतून पाहतात. तेव्हां म्हण ते, "पण कुणी मेला मावशी म्हणीत नाहीं." 'बायजाबाई'च्या पलीकडे मला अर्थ नाहीं." रडणाऱ्या मुन्नाला पाजण्यासाठीं रंगलेली मैफल सोडून मुश्तरी—एक आई घरांत जाते. पुत्र सुखासाठीं हपापलेली सुगंधा शंकररावांच्या निरुत्साहीपणाचा तिटकारा करते. अगदी अगतिक बनते.



'डंख' आणि 'रात्र' या विरोधावर आधारलेल्या दोन चांगल्या कथा. 'रात्र'-मध्ये लेखकाने लोला गोवेकरणीकडची रात्र व घरची रात्र यांतील परस्परविरोध कुशलतेने रंगविला आहे. कॉलेज जीवनांत भेटलेली व पाशवी वृत्तीमुळें बरबाद झालेली सुषमा मेहता लेखकाला तो संसाराच्या मधल्या टप्प्यावर आला असतां बेचन करते. आपण केलेल्या अपराधाच्या जाणीवेने तो अस्वस्थ होतो.

शांताराम पाटील यांच्या कथा जास्त वेधक बनतात त्या त्यांच्या निवेदन शैलीमुळें, आकर्षक निवेदनामुळें कथेतील अनुभव मनाची पकड घेतो. मग तो अनुभव विधवा वेणूच्या जीवनांतील असो, अथवा मातृत्वहीन सुगंधाच्या व्यक्ति जीवनांतील असो. किंवा बायजाबाईच्या समाजजीवनांतील असो.

शांताराम पाटलांची कथा ही स्त्री चित्रणांतच गुरफटून राहते व केवळ कामवासना हाच त्यांच्या कथांचा प्रमुख विषय या दोन मर्यादा 'जाग' वाचतांना तीव्रतेने जाणवत राहातात. या जाणीवेबरोबरच थोडी रुखरुखहि वाटते कारण अल्पायुषी ठरलेल्या या कथाकाराच्या आणखी कांहीं कथा वाचायला मिळणार नाहींत!

**—प्रा. वि. शं. चौघुले**

[**जाग** (कथासंग्रह)
लेखक : **शांताराम पाटील**
रंजना प्रकाशन, मूल्य : ४ रुपये]










[पान १० वरून–नमो युद्धाय]

लोक म्हणतील आतां दृष्टी जरा वास्तववादी झाली पण हा सुद्धां महत्त्वाचा बदल म्हटला पाहिजे. कारण अगदीं अलीकडे–पर्यंत गोवासुद्धां अहिंसक मार्गानें आणि सत्याग्रहाच्या उपायानें मुक्त करण्याचा निश्चय बोलून दाखविला जात असे. शेवटीं प्रत्यक्ष सैन्यच पाठवावे लागले. त्याशिवाय गोवा मुक्त करता आले नाहीं ही गोष्ट वेगळी. पाकिस्तानच्या बाबतींत ही भाषा सुद्धां तोंडांतून काढावयास कोणी तयार नाहीं हा बदल क्रांतिकारकच म्हटला पाहिजे. ही युद्धाची लाथ बसल्यामुळें लोक खडबडून जागे झाले आहेत आणि कितीतरी गोष्टींत बदल व्हावयास पाहिजे असे म्हणू लागले आहेत. युद्धासाठीं सगळ्यांत आधुनिक सामुग्री वापरावयाची. सामुग्रीच्या बाबतींत कोणीहि परक्या राष्ट्रावर अवलंबून राहावयाचे नाहीं. त्यासाठीं आपल्या देशाची कारखानदारी शक्यतितक्या झपाट्यानें वाढवावयाची असल्या तऱ्हेचे अध्यात्मवादापासून अगदीं दूर नेणारे विचार लोकांच्या डोक्यांत घर करूं लागले. तेव्हां जुनी अध्यात्मिक मूल्यें गेली आणि त्यांचे जागीं आधिभौतिक मूल्यांचा आपण स्वीकार करूं लागलों आहोंत. असे युद्धाचे तडाखे जर आपल्याला बसले नसते तर आपल्या मागचा बारा बलुतेदार असलेल्या स्वयंपूर्ण खेड्याची निर्मिती करण्याचा ससेमिरा कांहीं सुटत नव्हता. आणि आपल्याला सगळ्यांना तपोवनामध्यें वास करण्याची पाळी आली असती कीं काय अशी शंका येते.

१९४७ सालीं ब्रिटिशांनीं आपल्याला स्वराज्याचें दान दिलें. अर्थात असें म्हणण्यांत आमच्या पुढाऱ्यांना कमीपणा येतो म्हणून आम्हीं अहिंसक मार्गानें लढून स्वराज्य मिळविलें असें म्हणण्याची प्रथा पडली. साम्राज्यशाहीशी आपले युद्ध झालें आणि त्यांत आपण विजयी झालों अशी शिकवण नव्या पिढीला मिळूं लागली. आपल्या पुढाऱ्यांना वेळीअवेळीं साम्राज्यशाही राष्ट्रांचेवर गुरगुरण्याचा एक नवा उद्योग मिळाला. भातुकलीतील राष्ट्रांचे प्रतिनिधि गोळा करावयाचे आणि साम्राज्यशाहीच्या नांवानें सामुदायिकरीत्या बोटें मोडावयाचीं हा छोट्या राष्ट्रांचा मोठा करमणुकीचा उद्योग होऊन बसला. कम्युनिस्ट राष्ट्रांना तर फावलेच. त्यांनीं या उद्योगांना सारखे प्रोत्साहन दिले. कारण असल्या उद्योगामुळें पाश्चात्य राष्ट्रांशी असलेले या छोट्या राष्ट्रांचे संबंध अनायासेंच बिघडत होते आणि त्राता कोणी न राहिल्या-मुळें ती एकामागून एक कम्युनिझमला बळी पडत चालली होती. पाश्चात्य राष्ट्रांच्या साम्राज्यशाही विरुद्ध इतरांना भुंकावयास लावण्यांत कम्युनिस्टांचा डाव आहे हें भारतासारख्या अपक्व राष्ट्राच्या लक्षांत आले नाहीं म्हणून आम्ही साम्राज्यशाहीला विरोध या मूल्याला चिकटून बसलो तसें हें मूल्य वाईट नाहीं. पण हा विरोध लाल साम्राज्यशाहीला सुद्धां तितक्याच तीव्रतेनें व्हावयास पाहिजे होता. पाकिस्तान आणि चीन यांनीं लाथा मारावयास सुरुवात केल्यामुळें पाश्चात्य राष्ट्रांना विरोध करण्यांत



**युद्ध पीडितांची सेवा**

आपण चुकत तर नाहीं ना अशा शंका आपल्याला आतां येऊं लागल्या आहेत. एक साम्राज्यशाही दुसऱ्या साम्राज्यशाही विरुद्ध मदत करूं शकते याची आपल्याला जाणीव होऊं पहात आहे. साम्राज्यशाही म्हटली कीं, ती सर्वस्वीच वाईट असते असे आपल्याला आतां म्हणावयाचें कारण नाहीं. निदान आपल्याला मदत करणारी साम्राज्यशाही जरी वाईट असूं शकत नाहीं एवढा तरी आपण आपल्या समजुतीच्यामध्यें बदल करून घेणार, असा रंग दिसत आहे. साम्राज्यशाहीला विरोध, अगदीं कडकडून विरोध हें मूल्य आतां ढांसळत आहे. चीनच्या विरुद्ध पाश्चात्य साम्राज्यशाही खेरीज आपल्याला कोण मदत करणार ? रशिया मदत करील या भ्रमाचा भोपळा फुटेल. कारण या कामीं अमेरिकेची आपल्याला जितकी त्वरित आणि जितक्या मोठ्या प्रमाणावर मदत होईल तितकी रशियाची होणें शक्य नाहीं. आणि करण्याची इच्छा पण असणें शक्य नाहीं. सध्याच्या रशियन राज्यकर्त्यांनीं पार्टीला क्रुश्चोव्ह विरुद्ध जे आरोपपत्र सादर केले होते त्यामध्यें चीनच्या स्वारीच्या वेळीं त्यानें भारताला मदत केली हा एक आरोप होता हें विसरून कसे चालेल ? सरसकट साम्राज्यशाहीला विरोध हे आपले वैचारिक मूल्य आतां आपल्याला बदलावे लागणार आहे आणि इतर राष्ट्रांशीं आपण जे संबंध ठेवायचे ते आपल्या फायद्या तोट्याचा विचार करून ठेवावयाचे तत्त्वज्ञानाचा अथवा नीतीचा विचार करून ठेवावयाचे नाहींत. हें एक नवें वैचारिक मूल्य तरी आपल्याला घ्यावे लागेल नाहीं तर आपले स्वतंत्र अस्तित्व तरी नष्ट होईल.

दुसऱ्या राष्ट्राच्या अंतस्थ भानगडीत आपण पडायचे नाहीं हें सोंवळें तत्त्व पंचशीलांत आपण अंतर्भूत केले. पाकिस्तानशीं चालू असलेल्या युद्धांत मात्र हे सोवळे खुंटीवरून खालीं काढण्यांत येत नाहीं. पख्तूनिस्तानच्या स्वातंत्र्याच्या मागणीला भारताच्या पुढाऱ्यांनीं पाठिंबा द्यावा येथपर्यंत आपण पुढें आलो याचा अर्थ आपण दुसऱ्या राष्ट्राच्या अंतर्गत प्रश्नांत ढवळाढवळ करावयाची नाहीं या उच्च तत्त्वापासून खालीं आलो.



अनुक्रमणिका



**शस्त्रांची "खंडणी"**

हें योग्यच केलें. असले डावपेच नेहमींच करावे लागतात. पाकिस्तानसुद्धां हेंच करीत आहे. पंजाबमध्यें शीखांपैकीं एक वर्ग असा आहे कीं, ज्याला वाटते आपल्याला बहुसंख्य हिंदूचा सासुरवास होत आहे. या लोकांना असें वाटते कीं, आपल्याला स्वतंत्र सुभा पाहिजे. याचा अर्थ त्यांना भारतामधून फुटून वेगळे शिखिस्तान निर्माण करावयाचे आहे असे नाहीं. पण पाकिस्ताननें काय प्रचार चालविला आहे पाहा. ते शीखांना म्हणतात "तुम्हांला व आम्हांला दोघांनाहि हे हिंदु गुलामांसारखे वागवूं पाहात आहेत आपण दोघेहि त्यांची सत्ता झुगारून देऊं. तुम्हीं भारत सरकारविरुद्ध उठाव करा." आतां काश्मीरमधल्या त्यांच्या धर्मबांधवांनीं बंड करण्याचा प्रयत्न केला नाहीं मग पंजाबमधले शीख कसचे त्यांच्या हाकेला ओ देतात. (पण त्याचा सूड अमृतसरवर बाँब टाकून घेतलाच कीं नाहीं) पाकिस्तानच्या सध्याच्या सरकारविरुद्ध जे जे पक्ष तेथें असतील त्यांना आपण हाताशीं धरलें पाहिजे. असें करण्यांत दरवेळीं आपल्याला यश येईल असे नाहीं, पण तो एक उपाय कां करून पाहावयाचा नाहीं ? नीतीच्या तत्त्वांचे एखाद्या गाढवालासुद्धां सहन होणार नाहीं इतके मोठे ओझें, आपण आपल्या डोक्यावर कां घ्यावयाचे असे लोक आज म्हणूं लागले आहेत आणि जो जो आपण युद्धांत जास्त ओढले जाऊं तो तो उदात्त तत्वांची जी लोढणी आपल्या गळ्यांत युगपुरुषांनीं बांधलीं आहेत, ती आपण तोडून टाकू यांत शंका नाहीं. आतां सर्वनाशाचे संकट डोळ्या पुढें असतांना जुनीं मूल्यें कशी टिकवायची ?

तटस्थतेच्या मूल्याचे असेंच होणार आहे. आपल्याला लष्करी करारांचा विटाळ आहे. आपले पावित्र्य त्यांत जाते असें आपण समजत आलो. पाश्चात्य राष्ट्रांना आपल्या वर्तनांतले एक कोडें उलगडत नाहीं. शरीर विक्रय करणाऱ्या स्त्रीला मोबदल्यामध्यें पैसा मिळतो व ऐश्वर्य मिळते, या गोष्टीचा पतिव्रतेला कां राग यावा ? तिनें विषयी लोकांना असें कां म्हणावें कीं, त्या रूपाजीवा स्त्रीला तुम्हीं साहित्य कां पुरवितां ? मला कां पुरवीत नाहीं ? हें कोडें पाश्चात्य मुत्सद्यांना सुटत नाहीं. अमेरिकन्स तर म्हणतातच कीं, पाकिस्तान इतकींच तुम्हांला पण आम्हीं शस्त्रास्त्रें पुरवावयास तयार होतो. तुम्ही कां घेतली नाहींत ? तुम्हीं मखरांत कां जाऊन बसलांत ? बाहेर येऊन सामान्य राष्ट्रांच्या सारखे वागावयास कां तयार नाहीं ? आतां आम्हीं काय करावें ?

पाकिस्तानचे जवळ जवळ पाचशें रणगाडे आमच्या सैन्यानें निकामी केले याबद्दल भारतीय जनतेला अभिमान आहे पण त्याच्याच बरोबर जनता विचारते कीं, आम्हांला परदेशांचेकडून एवढे रणगाडे पूर्वींच कां फुकटांत मिळवितां आले नाहींत. लष्करी मदत हातांत आल्याशीं कारण ती वापरण्याबद्दल कसल्याहि अटी घातल्या असल्या तरी त्या मोडतां येतात हे पाकिस्ताननेंच आपल्याला दाखवून नाहीं कां दिले ? उदात्त तत्त्वें राष्ट्रहिताच्या आड येऊं लागली तर तीं तत्त्वें झुगारून देण्यांत येतात हा इतिहासामधील शेंकडों वर्षांचा अनुभव नाहीं कां ? राजकारण आणि नीतितत्त्वे ही एकमेकांत मिसळू नयेत असे युद्धजन्य परिस्थितीमुळें फार लोकांना वाटू लागले आहे, तेव्हां जुनी मूल्यें टिकावीत कशी ?

● ● ●



**भारतीय यशाचे शिल्पकार—वायुसैनिक**



पद्मविभूषण ज. चौधरी



पद्मविभूषण एअर व्हाईस मार्शल अर्जनसिंग

# शूरांना नम्र अभिवादन

**भारत** पाकिस्तानच्या युद्धानें घडविलेल्या एका नव्या, तेजस्वी, अस्मितापूर्ण इतिहासाचे महान शिल्पकार म्हणून साऱ्या भारतानें, एकमुखानें सेनाप्रमुख **जयंतनाथ चौधरी** व वायुसेनाप्रमुख **अर्जनसिंग** ह्यांचा, त्यांना योग्य ती साथ देणाऱ्या कुशल सेनाधिकाऱ्यांचा, जवानांचा व वायुदलांतील वैमानिकांचा जयजयकार केला. त्या जयजयकाराचे शब्द विरले नाहींत. विरणार नाहींत: कारण ती वीरगाथा आतां असंख्य हृदयांत स्थिरावली आहे. इंद्रायणीनें तारलेल्या अभंगांची 'अभंगता' तिला प्राप्त झाली आहे. आणि जसजसा काळ लोटेल, तसतसे त्याचे नवे, स्फूर्तिशाली तपशील हातीं येतील—आणि मग नगरानगरांतून त्या गाथेची पूजा बांधली जाईल. ती घडविण्याचें भाग्य ज्यांच्या भाळीं लिहिलें आहे, त्या सेनाधिकाऱ्यांचे, जवानांचे, वैमानिकांचे मी अभिनंदन करतो. त्यांच्या पराक्रमाचा यथोचित गौरव साऱ्यांनीं केला आहे, तसा आतां तो भारतीय शासनानेंही केला आहे. ले. ज. जयंतनाथ चौधरी व एअर व्हाईसमार्शल अर्जनसिंग ह्यांना राष्ट्रपतींनीं पद्मविभूषण व ले. ज. हरबक्षसिंग, काटोच, घिलन, एअर व्हा. मार्शल लाल व व्हा. चीफ ऑफ एअर स्टाफ ए. मार्शल आर. राजाराम ह्यांसारख्यांना पद्मभूषण ह्या पदव्या देऊन गौरविलें आहे. त्यांनीं केलेल्या कामगिरीचा हा यथोचित गौरव होत आहे.

ले. ज. चौधरी हे एक कर्तृत्ववान आणि भाग्यवान असे सेनापति आहेत. कर्तृत्ववान आणि भाग्यवान असे शब्द प्रयोग हेतुतः वापरले आहेत. मानवी कर्तृत्वाला दैवी अधिष्ठान वा आशिर्वाद लाभला कीं, तें कर्तृत्व सुवर्णमय बनते. चौधरींच्या नेतृत्वांतच 'यश' आहे. पण तें आपाततः मात्र आलेलें नाहीं. त्यांच्या कुटुंबांत सैनिकी पार्श्वभूमि आढळत नसली तरी त्यांच्या रक्तांत **मात्र** सैनिकी जिद्द, बेपर्वाई दिसून आली आहे. बंगालमधील बॅरिस्टरचा हा मुलगा अतिशय बंडखोर, खोड्याळ म्हणून वयाच्या १३ व्या वर्षी इंग्लंडला पाठविला गेला. तेथें तो शिकला. व सँढर्स्ट येथील सैनिकी विद्यालयांत दाखल झाला. वयाच्या विसाव्या वर्षी त्याला कमिशन मिळाले व घोडदळाच्या ७ व्या पलटणींत तो दाखल झाला. सेनादलांतील त्याची प्रगति अतिशय वेगानें झाली. दुसऱ्या महायुद्धांतली त्याची कामगिरी नेत्रदीपक होती. भारतीय सेनादलाचा स्टाफ ऑफिसर म्हणून त्यांनीं सुदान, इरिट्रिया, अबिसीनिया व पश्चिमी वाळवंटात रणांगण गाजविलें. १९४३ मध्यें क्वेट्टा येथील सेनाधिकारी विद्यालयांत ज्येष्ठ मार्गदर्शक म्हणून त्यांची नेमणुक झाली. त्यानंतर वर्षानें त्यांची १६ व्या लाइट इन्फन्टरीचे प्रमुख म्हणून नेमणुक झाली व ब्रह्मदेशांत कामगिरीवर पाठविण्यांत आले. त्या युद्धांत भारतीय सेनेनें दाखविलेल्या धैर्याला, तिच्या पराक्रमाला तोड नाहीं. स्वातंत्र्योत्तर काळांतलें त्यांचे कर्तृत्व आपल्या समोरच घडले आहे. हैद्राबाद, गोवा व पाकिस्तानच्या











यशाचे महान् शिल्पकार म्हणून ले. ज. चौधरी यांचा गौरव आम्ही साभिमान करतो.

एअर व्हा. मार्शल अर्जनसिंग ह्यांचें नांव मात्र आज नव्यानें गाजते आहे. पण कालपुरुषानें दिलेल्या पहिल्याच संधीचे त्यांनीं "अक्षरशः सोनें" केलें आहे. वास्तविक हातीं असलेलें साहित्य पहिल्या श्रेणीचें नसूनही भारतीय विमानदलानें जी महनीय कामगिरी केली तिला आधुनिक युद्धांचे इतिहासांत तोड नाहीं. पण ह्याचें श्रेय मात्र अर्जनसिंग ह्यांच्या कल्पक व धैर्यशाली नेतृत्वालाच दिले पाहिजे. अर्जनसिंग ह्यांनीं १९३८ सालीं क्रॅनवेलच्या रॉयल एअर फोर्सच्या कॉलेजचा अभ्यासक्रम पूर्ण केला. तेथील तीन वर्षांत त्यांनीं ह्या विषयाचा सर्वांगीण अभ्यास केला. १९३९ सालीं तें इंडियन एअर फोर्समध्यें दाखल झाले. दुसऱ्या महायुद्धांत त्यांनीं महत्त्वपूर्ण कामगिरी केली. म्हणून १९४८ मध्यें त्यांना Distinctive Flying Cross देण्यांत आला. १९६३ मध्यें अमेरिका, ब्रिटन व भारत ह्यांच्या वायुदलांनीं जें संयुक्त संचलन केलें त्याचें नेतृत्व अर्जनसिंग यांनींच केलें. त्यांच्या कौशल्याची एकच गोष्ट नोंदविण्यासारखी आहे. आज तें वेगवेगळ्या जातीच्या साठ प्रकारच्या विमानांचें संचालन करूं शकतात. त्यांची सर्वांगीण माहिती त्यांच्या जवळ आहे. विमानदलाचे प्रमुख म्हणून त्यांनीं १-८-६४ ला चार्ज घेतला व अवघ्या वर्षांत त्यांनीं अशी समर्थ पुनर्रचना केली कीं, विमानदलानें भीमपराक्रम करून दाखविला आहे. अर्जनसिंग नुकतेच म्हणाले, "आम्हीं आमचें नुकसान भरून काढले आहे." त्यांच्या स्वयंपूर्णतेची व सर्वज्ञतेची ही ग्वाही मानावी लागेल.

ह्या साऱ्या शूरांना दीपावलीचे नम्र अभिवादन !

## "चिर तरुण" शं. वा. कि.



श्री. किर्लोस्कर

**किर्लोस्कर** मासिकांचे (मनोहर, स्त्री सम्मीलित) आद्य संस्थापक, महाराष्ट्रांतील एक अग्रगण्य, प्रयोगशील संपादक, कल्पक चित्रकार, **शंकरराव किर्लोस्कर** ह्यांच्या वयाला पाऊणशे वर्षे लोटली आहेत ही गोष्ट साऱ्यांना एव्हांना विदित झाली आहेच. आज ते किर्लोस्करवाडीत नसले वा मासिकांसमवेत पुण्यांतही नसले तरी पण महाराष्ट्राच्या वाङ्मयीन, सामाजिक-जीवनावर त्यांच्या उपक्रमांनीं फार मोठा ठसा उमटविला आहे ही गोष्ट कुणालाही मान्यच करावी लागेल. किर्लोस्करांनीं केलेल्या वाङ्मयीन व सामाजिक कार्याचें मोल जाणून घेण्यासाठीं त्या काळांत शिरलें पाहिजे. आज कांहीं प्रश्न सुटल्यासारखे वाटताहेत. तर कांहीं कायम आहेत. ( उदा. बुवाबाजी ) शंकररावांच्या '**किर्लोस्कर**'नें '**सावरकर साहित्य**' व **महादेवशास्त्री दिवेकर** यांच्या लेखणीचें सहाय्य मिळवून जे नव-विचार प्रवर्तन केले त्याला तोड नाहीं. सावरकरांचे किती तरी लेख त्या काळीं गाजले. प्रखर टीकाही झाल्या—कारण आजही जे विचार सहजासहजी पचणें कठिण असे विचार त्यांनी २०–२५ वर्षांपूर्वी मांडले. आजही ( साईबाबा वा सत्यसाईबाबा—नांवें बदलतात फक्त—बुवा कायमच ) आम्हांला बुवा लागतातच. पण महादेवशास्त्री दिवेकरांनी अनेक (तथाकथित ) बुवांचें सडेतोड वस्त्रहरण केलेलें मला आठवते. आज बऱ्याचशा अंकांतून कादंबऱ्या देण्याची पद्धत पडली आहे. पण प्रा. फडके यांसारख्या प्रसिद्ध लेखकाची कादंबरी दरमहा देऊन शं. वा. कि. नीं आपले क्रांतिकारकत्व सिद्ध केले. **स्त्री व मनोहर** ही मासिकेंही केवळ 'फॅड' म्हणून ( वा धंदा म्हणून) काढली नाहींत, तर त्यामागें कांहीं एक दृष्टि होती आणि आज शं. वा. कि. संपादन-निवृत्त झाले असले तरी ह्या तीन्ही मासिकांचें त्यांनीं योजिलेलें स्वरूप प्रामुख्यानें कायम आहे. किर्लोस्कर हे नेहमीं 'ताजे' वाटते तें त्यामुळेंच ! योजकता, कल्पकता, चालू जीवनप्रवाहांशी समांतर राहून प्रवास करण्याची कांक्षा, रंजकता हे त्यांनीं जोपासलेले गुण आजही ही तीन मासिकें प्रगट करीत आहेत. किर्लोस्कर मासिकांनीं मराठींतले आजचे अनेक लेखक संस्कारित केले आहेत. स्त्री लेखिकांत आज अग्रेसर असलेल्या लेखिका ही त्यांचीच 'देन' आहे. नवे नवे प्रयोग, नव विचारप्रवर्तन ही त्यांची वैशिष्टयें आजही कायम आहेत. 'किर्लोस्कर खबर' पासून शं. वा. कि. चा प्रवास सुरू झाला. आणि त्यानें अनेक स्थित्यंतरें पाहिली. कांहींचे शिल्प-कर्तृत्वही सिद्ध केले. कधीं आपल्या "क्रांतिकारकत्वाचा" दावा मांडला नाहीं. डिंडिम पिटला नाहीं. पण शांतपणें तें घडवलें मात्र त्यांनीच ! ताम्हणकरांचा 'दाजी' ( व लेखक ताम्हणकर ) ही त्यांची खास देणगी. किर्लोस्करांच्या व्यक्तित्वांतच धाडस आहे. झेंप आहे. काळाच्या पलिकडे पाहणारी भेदक दृष्टि आहे. द्रष्टेपण आहे. आज घटप्रभेला वानप्रस्थाश्रमी वास करणारे शं. वा. कि. ह्यांचें हें सामाजिक व वाङ्मयीन ऋण मान्य करणें हें आम्हीं कर्तव्य समजतो. शंकरराव, जुग जुग जियो !

## "शोधक" वा. ल. कुलकर्णी

**मराठींतील** एक नामवंत टीकाकार, प्रभावी वक्ते, यशस्वी व लोकप्रिय प्राध्यापक म्हणून वा. ल. कुलकर्णी हें नांव साऱ्यांच्या परिचयाचें आहे. साहित्यविषयाच्या सर्व अभ्यासकांना आज वा. ल. कु.च्या पटणाऱ्या ( वा न पटणाऱ्याही ) मतांची दखल घ्यावी लागते. त्या मतांचा अभ्यास करावा लागतो. त्यांच्या मतांना डावलून आजची साहित्य टीका ( वा साहित्यिकही ) पुढें जाऊं शकत नाहीं अशी स्थिति आहे. त्यांच्या मतांना मान आहे आणि त्यांनीं मराठीं साहित्य टीकेंत कांहीं महत्त्वपूर्ण कामगिरी केली आहे ह्याबद्दल दुमत नाहीं. ह्या जाणीवेचा प्रत्यय त्यांच्या हैद्रा-




बाद साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय निवडीनें दिला आहे. वाङ्मयीन व्यवहारांत ललित लेखकाइतकेंच साहित्य समीक्षकालाही मानाचें स्थान आहे ह्याचीच जणुं ही पावती आहे असें म्हटलें पाहिजे. मराठी साहित्य महामंडळाचे वतीनें भरणारें हें पहिलेंच साहित्य संमेलन आहे ही गोष्ट ध्यानीं घेतली तर ह्या निवडीचे मोल अधिक ध्यानीं येईल.

वा. ल. कुलकर्णी हे नाशिकजवळच्या मखमलावादचे ! त्यांचे प्राथमिक व हायस्कूलचे शिक्षण नाशकांतच झालें. कॉलेजलाही ते दोन वर्षे नाशकांतच राहिले. परंतु 'गणित' हा आपला आवडीचा विषय असल्याची जाणीव घेऊन ते मुंबईला आले. विल्सनमध्यें त्यांनीं नांव घातलें. पण आपण गणितापेक्षां साहित्य विषयक पुस्तकेंच अधिक वाचतो हे ध्यानीं घेऊन त्यांनीं विषय बदलला. मराठी वाङ्मयाचे ते अभ्यासक बनले. नंतर कांहीं वर्षे विल्सन हायस्कूलमध्यें शिक्षक म्हणून त्यांनीं काम केलें. विल्सन कॉलेजांत प्राध्यापक म्हणून काम करीत असतांनाच त्यांनीं साहित्यटीका हा आपला आवडीचा व चिंतनाचा विषय केला. साहित्य संघांत ते कार्य करूं लागले. संघाच्या अभ्यासवर्गांना मार्गदर्शन करूं लागले. मुंबईच्या साहित्यिक व सांस्कृतिक चळवळींत भाग घेऊं लागले. त्यांच्या व्याख्यान–लेखनानें महाराष्ट्राच्या साहित्यिक जीवनाला एक नवा अभ्यासक–समीक्षक मिळवून दिला. मराठींत नव्यानें आलेल्या नवकथा–नवकाव्य ह्या प्रकारांची जाणीवपूर्वक दखल त्यांनीं घेतली. त्यांतली अपरिहार्यता त्यांनीं ओळखली. बदलत्या जीवनाचे आलेख जर बदलत्या रूपानें साहित्यांत येऊं लागले तर त्यांचे डोळस स्वागत करणें कर्तव्य होय ही भूमिका त्यांनीं घेतली. त्या प्रवाहांचा पुरस्कार केला व त्या प्रवाहांत कांहीं अनिष्ट प्रवृत्तीही शिरताहेत असें आढळले तेव्हां मालवणला स्पष्टपणें त्याबद्दल टीकाही केली. वा. ल. कुलकर्णी ह्यांची सारी साहित्य–टीका साहित्यविषयक श्रध्देतून, उत्साहातून व चिंतनांतून जन्म पावलेली आहे. त्यांची दृष्टि ( व वृत्ति ) शोधकाची आहे. त्यामुळें नवनवें चिंतन, नवनवा शोध ती घेत राहाते. हा शोध जीवनाचा म्हणजेच 'चैतन्या'चा आहे असे ते मानतात. चैतन्य हें जसें कधी संपत नाहीं, तसेंच जीवनही कधीं संपत नाहीं. नवनवीं रुपें तें दाखवतच राहते– त्यामुळेंच जीवनाचा भाष्यकार हा कधीं संपत नाहीं. कारण तें चैतन्य सतत त्याला आव्हान देत असते. युगें लोटलीं. पण जीवनाचा अंतिम अर्थ अजूनही गवसला नाहीं. कारण तें चिरनव, चैतन्यमय आहे ही त्यांची धारणा आहे. वा. ल. कु. यांचा वाङ्मयीन अभ्यास चतुरस्त्र आहे. कथा, कादंबरी, काव्य, नाटक, निबंध, टीका ह्या साऱ्या क्षेत्रांत त्यांना "गति" आहे. 'मत' आहे. मर्ढेकर आणि तुकाराम, गाडगीळ आणि वामन मल्हार, केळकर आणि सदानंद रेगे ह्यांचे त्यांच्या प्रतिभेला, शोधकतेला सारखेंच आकर्षण आहे. कला वय जाणत नाहीं. गुण जाणते. वा. ल. कुलकर्णी यांच्या साहित्य-भक्तींत त्यांनीं अनेक नव्या जुन्यांना साथ–सोबत दिली आहे. आज ते मराठवाड्यांत साहित्याची सेवा करीत आहेत. अनेक नवीनांना त्यांनीं हातीं धरून चालविले आहे. त्यांच्यातल्या शोधकाचे आम्हीं स्वागत करतो संमेलन पूर्णपणें यशस्वी होवो असें चिंतितो

# रांगणेकरांची जिद्द



श्री. रांगणेकर

"**महाराष्ट्राला** नाटकांचं आणि राजकारणाचं वेड आहे." असं आचार्य अत्रे नेहमीं म्हणतात. (आणि ते खरंही आहे) पण महाराष्ट्रांत नाटक मंडळ्या मात्र फारशा चालत नाहींत (हेंही दुर्दैवानें खरें आहे) त्याची कारणें तज्ञांनीं वा संशोधकांनीं शोधीत बसावे. खूप मनोरंजक माहिती त्यांना मिळेल. अलिकडच्या काळांत मात्र ज्यांनीं जिद्दीनें व कांहीं एका नेकीनें नाटक मंडळ्या चालविल्या, त्यांत मो. ग. रांगणेकर व भालचंद्र पेंढारकर ही दोनच नांवे प्रामुख्यानें घ्यावी लागतात. नाटक धंदा की हौस हा एक आणखी वादाचा मुद्दा. पण नाटकाला 'हौशे' जोंपर्यंत 'पैसे' मागतात तोंपर्यंत तो 'धंदा'च आहे म्हटले तर तें वावगें होणार नाहीं. मो. ग. रांगणेकर यांनीं नाटक कंपनी काढली. धंदा म्हणून ती चालविली. तिनें अनेक नवनवीन प्रयोग मराठी प्रेक्षकांना सादर केले आणि **नाट्य-निकेतन** नें आपला पंचवीस वर्षांचा कारभार पार पाडला आहे. नाटक कंपनीचा व्यवहार कांहीं इतर व्यवहारांइतका सोपा नसतो. आणि रांगणेकरांनाही तसा तो सोपा गेलेला नाहीं. (स्मरणिका मिळवून वाचा) पण मी लौकिक यशापयशापेक्षांही माणसांच्या निष्ठेला, प्रयत्नांना कल्पकतेला, त्यानें घेतलेल्या झेंपेला अधिक महत्त्व देतो. कारण लौकिक जीवनांतही गुणवत्ता आणि यश यांचें प्रमाण नेहमींच सम असतेच असे नाहीं. नाटकांच्या बाबतींत तर नाटककार नट व प्रेक्षक असें तिहेरी गणीत असतें. आणि तें कां व कसें सुटते ( वा सुटावे ) या बाबत कांहीं आडाखे बांधतां येत नाहींत. रांगणेकरांनाच मी हा प्रश्न विचारला तेव्हां ते म्हणाले कीं, इतक्या वर्षांनंतरही हें कोडें मला उलगडलेलें नाहीं. नाटक हें कांहीं आडाख्यांत बसत नाहीं. त्याचे फॉर्म्यूले नेहमीं यशस्वी होतातच असें नाहीं. नाटक 'दैवावर' चालते हेंच खरें !" आणि गेल्या कांहीं वर्षांत चाललेली ( व पडलेली–पण चांगली ) नाटकें पाहिलीं कीं, रांगणेकरांचें हें मत पटूं लागतें. रांगणेकरांनीं केवळ कंपनी चालविली ह्यालाही मी महत्त्व देत नाहीं. नवे नवे प्रयोग त्यांनीं केले तें करतांना त्यांनीं जिद्द बाळगली. गो. नी. दांडेकर, डॉ. वर्टी, मामा वरेरकर, वसुंधरा पटवर्धन, यांसारखे कांहीं नवेजुने नाटककार हातीं धरले. वसंत सबनीस, ग. दि. माडगुळकर व स्वतः असे मिळून एक नाटक लिहून तें सादर करण्याचा अभिनव प्रयोग केला. 'तीन एकांकिका' हाही त्यांचा एक नवा प्रयोगच ! संगीत नाटकांच्या इतिहासाला त्यांच्या कुलवधु, वहिनी, नंदनवन, जयजयकार,

[पृष्ठ ५८ वर पहा]







## राजकारण

### युनो आणि राष्ट्रकुल

**भारत** पाक युद्ध थांबलें आहे. (निदान कागदोपत्रीं तरी) अधुनमधून कांहीं पाकिस्तानी पुन्हां 'भुत्तोगिरी' करीत आंत येतात. मग त्यांना भारतीय रट्टा मारावा लागतो आहे. युनोचे निरीक्षक ही गंमत (त्यांना ही गंमतच, कारण ते निरीक्षक (म्ह. बघे) आहेत) पाहताहेत. मधुन-मधुन थाण्ट साहेबांकडे तक्रार करताहेत. त्या तक्रारींचे पुढें काय होते हे तेच जाणे. भारताने ह्या युद्धभंगांची एक दैनंदिनी ठेवली आहे. ती सादर केली जाते आहे. पण मधुनमधुन दिले जाणारे रट्टे हेच अखेर प्रभावी ठरत आहेत. त्यांत कांहीं नवे 'मृत्यु' नोंदविले जात आहेत. युद्ध-बंदीनंतरच्या काळांतली मृत्युसंख्या ही दुर्लक्ष्य करण्याजोगती नाहीं. पण तरीही युद्धबंदी जारी आहे. सैन्यें समोरासमोर उभीं आहेत. सज्ज आहेत. जागरुकतेनें वागणें त्यांना भाग पडत आहे. कारण युनो नामक राष्ट्रसंघाचे सदस्य ह्या भागांत शांतता प्रस्थापित करण्यांत यशस्वी झालेले नाहींत. ते होतील अशी आशाही नाहीं. कारण शांतता प्रस्थापित व्हायला शांततेनें नांदणारी सदिच्छा हवी असते. ती असती तर पाकिस्तानचें सारें वर्तनच आज घडले त्यापेक्षां वेगळे झाले असते. जागतिक संघटनेला जबाबदार असणारे राष्ट्र सुसंस्कृत, संयमी प्रकृतीचे असावे लागते. 'युनो'मध्यें पाक परराष्ट्रमंत्री भुत्तो यांनीं गेल्या महिना दीड महिन्यांत जीं वक्तव्यें केली, ज्या पद्धतीनें केली तीं पाहिली कीं, पाकिस्तान हे त्या संघटनेंत प्रतिनिधि म्हणून बसण्याच्या सुद्धां लायकीचें राष्ट्र नाहीं हेंच सिद्ध होतें. पण युद्धोन्मादानें भारावून जाऊन भारतावर प्रहार करणाऱ्या व नंतर फजीत पावलेल्या पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांकडून आत्यंतिक निराशेपोटी अशींच वक्तव्यें बाहेर पडणार! मुद्दे सरले कीं, माणसें शिवीगाळ करतात. आणि मुद्दे मांडायला बुद्धिमत्ताही लागते. पाकच्या हुकुमशहांच्या साऱ्या युद्ध योजना आमच्या सेनापतींनीं, जवानांनीं व वैमानिकांनीं पराभूत केल्यानें आकस्मितपणें भुत्तो गांगरून गेले. आणि त्यांचा तोल सुटला. त्यांच्या वागण्याला भारतीय परराष्ट्रमंत्र्यांनीं व प्रतिनिधींनीं आपल्या वागणुकीनें चोख उत्तर दिले. व जगाची दृष्टि स्थिरावली. पण ह्या साऱ्या युद्धकाळांत व युद्धोत्तर काळांत युनो व राष्ट्रकुल प्रमुख इंग्लंड यांनीं जें वर्तन केले तें चिंतनीय वाटते. भुत्तो यांचे वक्तव्य चालू असतांना सुरक्षा समितीच्या एकाही सदस्य राष्ट्रानें त्यांचा निषेध केला नाहीं. अध्यक्षांनीं आपला अधिकार वापरून त्यांना थांबविले नाहीं. वंशविच्छेदासारखा गंभीर आरोप वंशविच्छेदाचेच कार्य गेल्या अठरा वर्षांत सतत करणाऱ्या राष्ट्रानें भारतावर केला. पण कोटयावधी मुसलमान येथें सुखनैव राहताहेत, छगला, झाकीर हुसेन सारखे शासनांत आधार म्हणून वावरताहेत हें ठाऊक असणाऱ्या एकाहीं राष्ट्रानें पाकचा निषेध केला नाहीं. इंग्लंडचें वर्तन तर घृणास्पद होते. परवां ॲटलीसाहेब म्हणाले कीं, काश्मीर हे आशियांतील स्विट्झर्लंड म्हणून रहावे, स्वतंत्र रहावें. आणि हें राष्ट्र म्हणे लोकशाहीचे अग्रदूत आहे. सारी इंग्लिश लोकशाही ही जणुं भारतद्वेषावर पोसली जात आहे. लोकशाहीचे सर्व संकेत पाळून काश्मीर-भारत ऐक्य सिद्ध झालें आहे हें इंग्लंडला दिसत नाहीं काय? काश्मीरची तलवार टांगती ठेवून भारतीय अस्मिता कधी फूलूंच नये यासाठीं पाश्चात्य राष्ट्रें प्रयत्नशील दिसतात. पण प्रत्यक्ष युद्धांत व राजनीतिविषयक धोरणांतही भारतानें जे कणखर धोरण स्वीकारले आहे. त्यामुळें जनमत बदलते आहे असें दिसते. अमेरिकेची दृष्टि बदलते आहे. पण इंग्लंडची मात्र नाहीं. पण स्वतंत्र राष्ट्रानें स्वतःची अस्मिता रक्षितांना इतरांच्या भावभावनांचा बाऊ करून चालणार नाहीं. पाकिस्तानी खंजीर हीच मुळीं एक ब्रिटिशांची 'चाल' होती. आज सतत ती जखम सलते आहे. पण युनोत हळूहळूं वृत्ति बदल होत आहे. तो ठाम धोरणानेंच होईल, स्वाभिमानी बाण्यानेंच होईल हें सिद्ध झालें आहे. पण राष्ट्रकुलविषयक धोरणाचा मात्र एकदां पुर्नविचार व्हावा असें वाटते. ह्याचीं कारणें दोन! राष्ट्रकुलांतलें आमचें अस्तित्त्व हे कांहीं एक स्वार्थ मनीं धरून ब्रिटिशांनीं गृहित धरलें आहे. आसाम, नागालॅण्ड-मधील ताज्या वार्ता, पिझो–स्कॉट युति ह्या गोष्टी परिणामतः धोकादायक आहेत. हा झिजवीत नेणारा रोग ठरण्याची भीति संभवते. दुसरा भाग ब्रिटिश नीतीचा! कच्छ–काश्मीर प्रकरणी ब्रिटिशांनीं स्पष्टपणें घेतलेली भारत विरोधी भूमिका ह्या घटनांचे पार्श्वभूमीवर पुर्नविचार व्हायलाच हवा. ती आजची नितांत गरज आहे.

## साहित्य

### हैद्राबादचें साहित्यसंमेलन

ह्या महिन्याचे अखेरीस हैद्राबाद येथें मराठी साहित्यसंमेलन भरत आहे. विशाल महाराष्ट्राच्या निर्मितीनंतर



अनुक्रमणिका






स्थापन झालेल्या महामंडळाच्या विद्यमानें भरत असलेलें पहिलेंच संमेलन ! अध्यक्ष वा. ल. कुलकर्णी, एक नामवंत टीकाकार व वक्ते. मराठवाडा विद्यापीठाचे मराठी विभागाचे प्रमुख !

साहित्यसंमेलन म्हटले कीं, कांहीं गोष्टी ठरून गेल्या आहेत. त्यांच्यासंबंधींची पुनरावृत्ती करीत नाहीं. त्या सोऱ्यांना तोंडपाठ आहेत. परंतु कांहीं गोष्टी अजून व्हायला हव्या आहेत. त्या होणें आवश्यक आहे–संमेलन अधिक उपयुक्त व क्रियाशील होण्याचे दृष्टीनें ! अलिकडे साहित्यसंमेलन हें 'साईट सीइंग'-साठीं राबविले जाते आहे. कांहीं प्रमाणांत हें घडेल हें मी समजूं शकतो. पण संमेलनाला साहित्यिकांनीं यावें, त्यांच्या बुद्धि वैभवाचा लाभ श्रोत्यांना व्हावा ही खरी गरज आहे. त्या दृष्टीनें कांहीं सूचना.

१) साहित्यसंमेलनांत सर्व लेखक–लेखिकांचे एक अनौपचारिक संमेलन व्हावें. त्यांत परस्पर परिचय व्हावा. लेखक–प्रकाशकांच्या अडीअडचणींचा विचार व्हावा. त्यासाठीं त्या त्या जिल्ह्याच्या प्रमुख साहित्य संस्थेचें सहकार्य घेतां येईल. चांगल्या – निवडक अशा लेखक–लेखिकांचा एखादा परिसंवाद ठेवतां येऊं शकेल.

२) १९६५ मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचे विषयवारीनें असें प्रदर्शन भरवावें. सामुदायिक प्रदर्शनानें एक नवा विश्वास उत्पन्न होऊं शकेल. सजावट, छपाई वगैरे बाबतचे नवे प्रयोग एकदम ध्यानीं येतील.

३) साहित्यसंमेलनांत होणाऱ्या चर्चा, परिसंवाद व काव्य गायनांत तेच ते चेहरे उभे करण्याऐवजीं कांहीं नवी नांवें येतील असा जाणीवपूर्वक प्रयत्न व्हावा. अनेक तरुण लेखक व कवि ह्या पद्धतीनें परिचित होऊं शकतील.

४) 'राज्य मराठीचें' हें जर खऱ्याखुऱ्या अर्थानें सिद्ध व्हावेंसे वाटत असेल तर मराठीचा शब्दकोष समृद्ध करणारी एखादी योजना आंखली गेली पाहिजे. राज्य व्यवहार कोषही तयार व्हायला हवा. त्यासाठीं कांहीं आंखणी व्हावी.

५) अर्वाचीन मराठी काव्य (प्रा. जोग) ह्या सारख्या प्रयत्नांना आतां दीर्घकाळ लोटला आहे. नाटक, कथा, कादंबरी, निबंध ह्या व ह्या सारख्या विषयांबाबत आतां ग्रंथरूप नवें चिंतन आवश्यक आहे. त्यासाठीं विविध माणसें नेमून योजनाबद्ध प्रयत्न व्हावा. श्री. फडके यांच्या 'प्रतिभासाधना'ला कितीही शिव्या मोजल्या तरी साहित्याच्या मूलभूत अभ्यासासाठीं पुन्हां अभ्यासकांना तेंच पुस्तक अभ्यासावे लागते. त्यासंबंधीचे कांहीं चिकित्सक लेखन, व्यापक बैठकीवर. ह्या संबंधीचे पाश्चात्य ग्रंथविचारांत घेऊन, होणें आवश्यक वाटते.

६) **'साहित्य परिषद पत्रिका'** हें मुखपत्र अधिक प्रातिनिधिक व्हावें. वाङ्‌याच्या विविध शाखांना त्यांत वाव असावा. नव्या नव्या वाङ्मयीन घटनांची व प्रवाहांची त्यांत साक्षेपी दखल घेतली जावी.

७) साहित्य महामंडळानें पत्रिकेचा दरवर्षीचा एक अंक त्या त्या वर्षीच्या साहित्याची सूची व चर्चा करण्यासाठीं उपयोगांत आणावा. ती चर्चा पूर्वग्रहातीत असावी. तज्ञांनीं केलेली असावी.

## म्हणे जीवनाचे भाष्यकार ! !

**भोंवती** तोफा गरजताहेत. मशीनगन्सच्या फैरी झडताहेत. विमानांची घरघर चालूं आहे. घरें उध्वस्त होताहेत. निर्वासितांच्या रांगा कसाबसा संसार सांवरीत मार्गक्रमण करीत आहेत. मृत्यूच्या बेहोषीनें रडार फोडण्यासाठीं पंचविशीचे तरुण फुलपांखराप्रमाणें झेंपावत आहेत. विमानाशी विमान भिडते आहे. थंडीवाऱ्यांतही उष्ण रक्ताचे सैनिक खंदकांतून ताठ मानेनें उभे आहेत. सामान्यांना असामान्याचें आवाहन होत आहे आणि माणसें हीं सारीं आव्हानें आनंदानें स्वीकारीत आहेत. पण . . . . .

पण जीवनाचे भाष्यकार कुठें आहेत ? "जीवन आम्हां कळले हो" हा दावा कुठें आहे ? भोंवती हें जे घडत आहे त्याचा आणि त्यांचा कांहीं संबंध आहे काय ? त्याच्या बऱ्यावाइटाचा परिणाम त्यांच्यावर होणार नाहीं काय ? त्याच्याशीं त्यांना कांहीं कर्तव्य नाहीं काय ? चीननें वार केला आणि कवींनी समरगीतांचे पाऊस पाडले. आज पराक्रमाचा पाऊस पंजाब, काश्मीरमध्यें पडला. एक नवें महाभारत लिहिले गेले. नवी जागृति सिद्ध झाली. नवी 'हकीगत' लिहिली गेली. पण मराठी साहित्यिकांच्या उरीं चरे गेल्याचें दिसत मात्र नाहीं. परवां एका फार मोठ्या लेखकानें ही तक्रार केली. तो कार्यरत आहे. पण त्यालाच ह्यांच्यापैकीं कांहीं जण म्हणत होते "तुला काय करायचाय् हा उद्योग ? पाकिस्तानच्या युद्धांत खरा 'समर' घडला. पण १९६२ सालीं उधाणलेली समरगीतें मात्र आटली. एखादा 'कुसुमाग्रज'च हलला. एखादे 'पु. ल. दे' भारावून गेले. आजचे 'साहित्य हें जीवनाच्या जवळ जाऊं इच्छित असेल (तशी त्याची प्रतिज्ञा आहे ) तर कांहीं नवे विषय प्रथमच चालून आले आहेत त्यांचे त्यांनीं स्वागत करायला नको काय ? बरेचसे पत्रकार गेले. छायाचित्रकार गेले. कांहीं प्रकाशकही आतां प्रत्यक्ष युद्धक्षेत्रीं जात आहेत (असें ऐकतो) मराठी साहित्यिकांनाही हें आवाहन आहे. कारण युद्ध केवळ मानव हानी करीत नाहीं. तर अनेक नवनवीन समस्याही तें देऊन जातें. प्रत्येक युद्धानें त्या त्या समाजाचीही कांहीं मूल्य –निश्चिती व मूल्य–बदल केले आहेत. आपण प्रथमच एक युद्ध लढलो आहोंत. कांहीं वीर –गाथाही मिळतील, तर कांहीं करुण कथा ही त्यांना गवसतील. जीवन हें बहुरंगी आहे. त्यांतला हा युद्ध–रंग ही पाहण्याचें भाग्य चालून आलें आहे. स्वकर्तृत्वानें ! आम्हीं ह्या पानांकडे "आमचा काय संबंध ?" ह्या भूमिकेनें मात्र पाहतां कामा नये. किंवहुना कुठल्याच जीवनानुभवाकडे कलाकारानें अशी पाठ फिरवतां कामा नये—कारण जीवनाचें काव्य अखेर जीवनाच्या जवळ जाऊनच मिळवितां येऊं शकेल.

## जनाप्पा गेले

**गोमांतक** मुक्तिसंग्रामाचे एक आघाडीचे नेते, थोर जनसेवक व साहित्यिक श्री. जनाप्पा विष्णु कामत (जनार्दन विष्णु कामत हे खरे नांव–पण वर्षानुवर्षं लोकांच्या तोंडी 'जनाप्पा'च होते) हे वयाच्या ७९ व्या वर्षीं कालवश झाले. जनाप्पा कामत हे एक चालते बोलते चैतन्य होते हें त्यांना ओळखणाऱ्यांना ठाऊक आहे. कांहीं जीवननिष्ठा घेऊन हीं माणसें जन्म घेतात. त्या निष्ठांसाठीं जीवनभर झगडतात आणि मग्नांनाही त्या निष्ठांचीच चिंता वाहतात. १९२८ सालीं गोव्यांत मसुराश्रमातर्फे १०,००० गावड्यांच्या सामुदायिक शुद्धीकरणाचा








जो कार्यक्रम आयोजित केला गेला त्यांत जनाप्पांचा वांटा सिंहाचा होता. त्यानंतर त्यांना पोर्तुगीज शासनाचा पाहुणचार भोगावा लागला व नंतर गोव्यांतून तडीपारही व्हावे लागले. पण स्वातंत्र्याचे लढे हे मनांत फुलावे लागतात. जनाप्पांनीं मुंबईहून हे प्रयत्न केले. 'दूधसागर'मधून त्यांनीं प्रचार केला. नैमित्तिक लेखन त्यांनीं विपुल केलें. मुंबईकरांना तें ठाऊकही आहे. त्यांचीं व्याख्यानेंहि ऐकण्याचें भाग्य मला लाभलें होतें. गोव्याच्या सामाजिक चळवळीचा इतिहास पहिला खंड, सत्तरीतील पन्नाशी हे त्यांचे ग्रंथही प्रसिद्ध झाले आहेत. जनाप्पा कामत म्हणजे पांढरा शुभ्र फेटा, कोट, धोतर, चष्मा लावलेला सत्तरीतील अक्षरशः पन्नाशीचा गृहस्थ ! आवाज कलदार रुपयासारखा खणखणीत. त्यांच्या आवाजाची एकच आठवण सांगतो. २८ मे हा स्वतंत्र्यवीर सावरकरांचा जन्म दिन ! त्या दिवशीं त्यांना भेटण्याची अनुमति ३।४ वर्षांपूर्वीपर्यंत असे. त्या दिवशीं सायंकाळीं ८ चे सुमारास आम्हीं ५।६ माणसें खालच्या मजल्यावरच्या बैठकीच्या खोलींत बसलों होतो. आम्हांला उशीर झाला असल्यानें व तात्याराव थकले असल्यानें 'भेट होणार नाहीं' म्हणून आम्हांस सांगण्यांत आले. पण जनाप्पा म्हणाले कीं, मी भेटल्याशिवाय जाऊं शकणार नाहीं. त्यांना तुम्ही कळवा." पण, कार्यकर्ते वर जाईनात. मग नाइलाजानें आम्हीं बाहेर व्हरांड्यात येऊन उभे राहिलो. जनाप्पांचा खणखणित आवाज ऐकून तात्यारावांनीं चौकशी केली. 'जनाप्पा कामत थांबले आहेत' असें कळतांच 'मी खालीं येतो' असा निरोप आला—आणि थकलेले, क्षीणकाय सावरकर खाली आले. त्यांनीं जनाप्पांना मिठी मारली. जनाप्पा त्यांच्या पायीं लागले. जनाप्पांच्या आवाजानें किमया केली व नाकारलेली भेट आम्हांला मिळाली.

जनाप्पा गेले. स्वातंत्र्य पाहून गेले. गोवा महाराष्ट्रांत आलेला पाहून ते गेले असते तर त्यांची अधिक तृप्ति झाली असती हें खरें ! पण मृत्यूपुढें इलाज नाहीं हेंही खरें नव्हे काय ? ईश्वर मृतात्म्यास शांति देवो.

—सारस्वत

[पृष्ठ ५५ वरून—सन्मान पुष्पें]

आशिर्वाद, भूमिकन्या, सीता, एक होता म्हातारा, ह्या नाटकांची नोंद घ्यावी लागेल. रांगणेकरांच्या नाटकांपैकीं साऱ्यांनाच लौकिक यश मिळालें नसेल, पण रांगणेकरांनीं हाताळलेल्या विषयांची विविधता पाहिली तर त्यांच्या ताकदीची कल्पना येते. अमृत, हिमालयाची वायको, धाकटी आई, जयजयकार, रंभा, नंदनवन, एक होता म्हातारा ह्या नाटकांच्या विषयांची झेंप फार मोठी, मन थक्क करणारी आहे. नाटकांच्या यशाबद्दल बोलतांना रांगणेकर म्हणाले, नाटकें भावनेवर चालतात. आमचा प्रेक्षक प्रामुख्यानें भावनाप्रधान आहे. त्याच्यापुढें बुद्धिप्रधान वा आपल्या समाजाची नसलेली नाटकें ठेवलीं तर त्याला ती पेलत नाहींत. रांगणेकर यांनीं नवनवीन नाटकें दिलींत. तसेंच नाट्य निर्मिती व नाट्य दिग्दर्शनाचा एक नवा आदर्शही घालून दिला. 'नाट्यनिकेतन'ची नाटकें सुविहीत असतात. 'तो मी नव्हेच' ह्या नाटकानें तर नाट्यनिकेतननें व रांगणेकरांनीं चांगल्या नाट्यदिग्दर्शन व निर्मितीचा जणुं वास्तुपाठच दिला आहे. 'कुलवधु'-सारखें इतिहास घडविणारें नाटक त्यांनीं अवघ्या साडेचार दिवसांत लिहिले तर **'माझे घर'** हें नाटक अंशतः लिहून, दिवसा-तालमी व रात्रीं नाट्यलेखन अशा पद्धतीनें त्यांनीं अवघ्या २२ दिवसांत सादर केले. रांगणेकरांनीं आज नाट्यलेखन थांबविलें असलें तरी, नाट्यविषयक जिद्द कायम आहे. ग दि. माडगुळकर हे रांगणेकरांसाठीं नवें संगीतप्रधान नाटक लिहीत आहेत. सर्व प्रांतांना मराठी नाटकांची ओळख करून द्यावी व इतर प्रांतातल्या चांगल्या नाटकांची मराठी नाट्य रसिकांना ओळख करून द्यावी व प्रतिवर्षी येणाऱ्या चांगल्या नाटकांची इंग्रजींत भाषांतरें करून Best Indian plays म्हणून ती जगाला सादर करावी अशी भव्य स्वप्नें रांगणेकर पाहतात. ही स्वप्नें पाहणारे रांगणेकर मला मोठे वाटतात. त्यांची जिद्द मोठी वाटते. तथें लौकिक यशापयशाच्या फूटपट्ट्या थिट्या पडतात. कुचकामी ठरतात असें मला वाटते.

—आदित्य











दिवाळी संपली, दिवाळीचे खास अंकही वाचून संपले. (कांहीं संपले नाहींत – कारणें विचारूं नका) पण 'दिवाळी' च्या चांगल्या साहित्याची "चव" बिघडूं नये म्हणून वाचा.




जानेवारी १९६६ ▩ पृष्ठें ६० ▩ मूल्य १ रुपया

(जाहीर) 'तसा' वाटावा

**कारण ❋**

"...स लिहितो"—ह्या मुलाखत मालेंत भेटतील कादंबरीकार **श्री. ना. पेंडसे.**

'**उसळलें हिमगिरीचे आव्हान**' — स्वीकारणाऱ्या कर्तबगार महाराष्ट्रीय महिला **सुधा नेरुरकर** यांचें अनुभव कथन (अर्थातच गिर्यारोहणाचें)

"**नाटक मंडळी ऽऽऽऽऽ त मी**" — गोपालकृष्ण भोबे

**रवींद्रांची 'चित्रांगदा'** — मोहिनी वर्दे.

**चार फक्कड कथा**

**प्र. श्री. नेरुरकर, य. दि. फडके, श्रीराम कामत, वि. रा. भाटकर**

**"यंदाचे (१९६५) दिवाळी अंक"**

एक परखड व मर्मग्राही खास लेख .

व

दीपमाला, सन्मानपूर्ण, रुपेरी अक्षरं, रंगमंच, पानपुरी वगैरे नेहमीची आकर्षक सदरं, व्यंगचित्रे वगैरे.

प्रकाशक
दलाल आर्ट स्टुडिओ,
४२, केनडी ब्रीज, मुंबई ४.








अनुक्रमणिका

